

# नवभारत

जानेवारी २०१०

गिरणगांवचा शेवट ?




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६३। अंक ४। जानेवारी २०१०
पौष/माघ शके १९३१
वार्षिक वर्गणी ३०० रूपये
या अंकाची किंमत रू. २५/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## जानेवारी २०१०

## अनुक्रमणिका

# आदरांजली

कै. पं. गोविंदशास्त्री केळकर याचा जन्म नागांव (अलिबाग) येथे दि. २१ सप्टेंबर १९१८ रोजी झाला. ते लहान असताना त्यांचे कुटुंबीय नागांवहून चौल येथे स्थलांतरित झाले. त्या काळी मुलांना शाळेत पाठवत नसल्यामुळे, १० व्या वर्षी मौंजीबंधनानंतर, घरच्याच पाठशाळेत ५ वेदांचे अध्ययन झाले. त्याचवेळी योगायोगाने, थोरले बंधू कै. पं. यज्ञेश्वरशास्त्री केळकर हे साताऱ्याच्या संस्कृत विद्यापीठात नोकरीला होते. ते शिक्षणासाठी साताऱ्यात बोलवित होते. पण घरून परवानगी नव्हती. तशी परवानगी मिळावी म्हणून दारात असणाऱ्या पद्मावती देवीला त्यांनी १०८ प्रदक्षिणा घातल्या आणि त्याचे फळ मिळाले. साताऱ्याला जाऊन सर्वप्रथम पुण्याच्या सभेची एक परीक्षा दिली. नंतर ५ वर्षे सांगलीला शाळेत शिक्षण घेत असताना निरनिराळ्या ग्रंथांचा अभ्यास करून कलकत्त्याची 'व्याकरणतीर्थ' ही पदवी मिळाली. मधल्या काळात पुणे येथील वास्तव्यात कै. पं. दत्तमहाराज कवीश्वरशास्त्री यांचेकडे काही काळ अध्ययन केले. परत साताऱ्याला येऊन '१९४५ साली वेदशास्त्रोत्तेजक सभेची' (पुणे) 'वेदान्त चूडामणी' ही पदवी ग्रहण केली. त्यामुळे नावापुढे शास्त्री ही उपाधी प्राप्त झाली. त्याच वर्षी दि. १ मार्च रोजी, ते विवाहबद्ध झाले आणि त्याचसुमारास वाई येथील प्राज्ञ-पाठशाळेत संस्कृत अध्यापनाचे काम पण त्यांना मिळाले. पगार होता फक्त रू. ४५/-. माध्यमिक शाळेत जास्त पगारावर अध्यापक म्हणून नोकरी मिळत असून देखील त्यांनी कार्यसंतोषासाठी पाठशाळेतील नोकरीच स्वीकारली. या काळातील त्यांचे अनेक विद्यार्थी काव्यतीर्थ होऊन उच्च पदांवर कार्य करून निवृत्तपण झाले आहेत. याच काळात, त्यांना प्राथमिक अध्यापनाची आवड नसल्यामुळे व संशोधनात्मक कार्यात जास्त रूची असल्यामुळे त्यांची नेमणूक 'धर्मकोश' कार्यालयात अर्धवेळ कामासाठी केली व अर्धवेळ अध्यापनाचे काम चालूच होते. कालांतराने पाठशाळा बंद झाल्याने ते पूर्ण काळ धर्मकोशात संपादनाचे कार्य करू लागले. 'धर्मकोश' हे जागतिक किर्तीचे कार्यालय आहे. मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे मुख्य संपादक व केळकरशास्त्री उपसंपादक म्हणून कार्यरत होते. तर्कतीर्थांच्या पश्चात ५ वर्षे केळकरशास्त्रींनी मुख्य संपादक म्हणून पण काम केले. वयाच्या ८१ व्या वर्षापर्यंत त्यांनी संस्थेची निरपेक्ष भावनेने सेवा केली. दि. १६ ऑगस्ट २००९ रोजी पहाटे ४ वा. ३० मि. ठाणे येथे त्यांचे देहावसान झाले. त्यांच्या पश्चात त्यांच्या धर्मपत्नी श्रीमती राधाबाई, तीन पुत्र, एक कन्या, जावई, स्नुषा, नातवंडे, पणतु असा मोठा परिवार आहे.

कै. केळकरशास्त्री हे एक अत्यंत कर्मठ, तत्त्वनिष्ठ, सात्त्विक, बुद्धिमान व विविध कला-गुणसंपन्न असे प्रतिभाशाली व्यक्तिमत्त्व पंचतत्त्वात विलीन झाले. अशा महान, क्रियावान पंडिताच्या स्मृतीला आम्ही प्राज्ञपाठशाळा मंडळ परिवारातर्फे ही आदरांजली वाहतो.

अनुक्रमणिका






# स्वेच्छा देह विसर्जन : अर्थ आणि अनर्थ

श्री. बाबूराव चंदावार

**प्रस्तावना :**

विनोबांच्या स्वेच्छा देह विसर्जनाला त्यांच्या निकट-वर्तियांनी 'ब्रह्मनिर्वाण' म्हटले. यापैकी जे सर्वोदय चळवळीत सक्रिय होते ते याचे अनुकरण करण्याच्या मन:स्थितीत आले होते. यातलेच एक ज्येष्ठ वसंतराव नारगोळकर व त्यांच्या सहधर्मचारिणी कुसुमताई नारगोळकर होत. स्वेच्छा देह विसर्जनाचा विचार या दोघांच्या मनात आला. कुसुमताईच्या अचानक निधनानंतर मी कैनाडच्या विज्ञान आश्रमात मुद्दामच गेलो होतो. यावेळी मी काहीसा आजारी होतो. तरीही वसंतरावांना त्यांच्या कैनाडच्या निवासस्थानी जाऊन भेटणे मला गरजेचे वाटले होते. मी कैनाडला पोहोचलो व वसंतरावांशी संवाद साधला. ते मुळात धैर्यवान. पण कुसुमताईचे अचानक निधन झाल्यामुळे काहीसे मनाने खचलेले दिसले होते. माझ्यापेक्षा वयाने ज्येष्ठ व गंभीर प्रकृतीचे म्हणून, त्यांचे सांत्वन ते मी काय करणार. पण, माझ्याशी संवाद केल्यामुळे त्यांना बरे वाटले होते. वसंतराव व कुसुमताई या दोघांनी एकत्रच देह विसर्जन करण्याचा संकल्प सोडला होता. आजारी पडल्यामुळे कुसुमताईचे अचानक निधन झाले. म्हणून त्यांचा संकल्प सिद्धीस जाऊ शकला नव्हता. याची खंत वसंतरावांनी माझ्याजवळ बोलून दाखवली होती. मी कैनाड सोडून त्यावेळच्या माझ्या घरी भिवंडीला परतलो. पुढे माझे भिवंडी सुटले. पत्नी सौ. वनितासह पुण्याला आलो व पुण्यातच घर करून राहू लागलो. एक दिवस अचानकच वसंतरावांचे मला पोस्टकार्ड पत्र आले. अन्य मजकुरासह त्यात संत नामदेवाच्या अभंगाची 'काळ देहासी आला खाऊ। आम्ही आनंदे नाचूं गाऊं।' ही दोन कडवी होती. यावरून मी वसंतरावांची मन:स्थिती लक्षात घेतली होती. काही दिवसानंतर श्री. विजय दिवाण यांचे गागोद्याहून पत्र आले. त्यात वसंतरावांनी कैनाडचे विज्ञान आश्रम सोडले व ते कुठे गेले हे कोणालाच माहीत नाही, असे लिहिले होते. वसंतरावांनी पुण्याला कुमुद पटेल या त्यांच्या बहिणीकडे जाऊन व त्यांची स्वत:ची बॅग ठेवली व निघून गेले. नंतर ते परत आलेच नाहीत. ते वसंतरावांच्या बहिणीकडे दूरध्वनीवर चौकशी केल्यामुळे कळले. त्या-नंतर बराच काळ लोटला व वसंतरावांचा पत्ता पोलिसांनाही लागला नाही. म्हणून त्यांनी या जगाचा शेवटचा निरोप घेतला व ते हयात नाहीत, असे मानले गेले. त्यांनी देहविसर्जन केले. पण, कोणालाच आजवर कळलेले नाही.

**विनोबांचे ब्रह्मनिर्वाण :**

एक ज्येष्ठ कार्यकर्ता व सर्वोदय साधक आमच्यातून नाहीसा झाला. याची हळहळ सर्वोदय कार्यातल्या सर्वांनाच लागून होती. वसंतराव विनोबांचे अनुकरण करून देह विसर्जन करू शकले किंवा काय, याविषयी निश्चितपणे कांहीच सांगता येण्यासारखे नाही. पण, विनोबांच्या देहविसर्जनाचे त्यांना आकर्षण वाटले होते एवढे मात्र खरे आहे. देह विसर्जनाचे अनेक प्रकार प्रचलित आहेत. नैराश्य आले म्हणून देह विसर्जन करण्याचा प्रकार, ज्याला आत्महत्या म्हटले जाते, सर्व विदीत आहे. पण, विनोबांनी केलेले देह विसर्जन जगण्याचे प्रयोजन संपल्यामुळे केले गेलेले समर्पण होते असे म्हणता येऊ शकते. हिन्दु धर्मात प्रायोपवेशन हा प्रकार प्रचलित आहे. जैन धर्मात संथारा हा प्रकार आहे. विनोबा कोणत्या प्रकारात मोडतात हे सांगणे तसे कठीणच आहे. पण, त्यांनी आत्महत्या केली असे म्हटले गेलेले नाही व यावरच (स्व.) आचार्य दादा धर्माधिकारी यांनी भर दिला होता. मी विनोबांच्या देहविसर्जनाच्या वेळी पवनारच्या ब्रह्म विद्यामंदिरात त्यांच्या कुटीत उपस्थित होतो. मृतदेहाला प्रदक्षिणा घालण्याचे सोपस्कार उत्तर प्रदेशचे माझे दोन मित्र (स्व.) नरेन्द्रभाई व (स्व.) महावीर भाई यांच्या सांगण्यावरून त्यांच्या सोबतच पार पाडले होते. यावेळी विनोबांचे निकटवर्ती मूळचे केरळ-

अनुक्रमणिका

निवासी (स्व.) गोविन्दन यांनी आमचे छायाचित्रही काढले होते. ते हयात नाहीत. तेव्हा, विनोबांच्या देह विसर्जनाला ब्रह्मनिर्वाण म्हणण्याची समयसूचकता ब्रह्मविद्या-मंदिरातल्या भगिनींनी दाखवली होती व ती मला आकर्षून ही गेली. पण, यावर मी त्यावेळी फारसा विचार केला नव्हता. यावेळी मात्र त्यावर विचार करायला हवा असे वाटते. अर्थात विनोबांच्या कुडीतून त्यांचे प्राण निघून जाईपर्यंत विनोबा प्रसन्न होते व हेच प्रत्यक्षात घडलेले असल्यामुळे कोणत्याही नैराश्येने विनोबांना ग्रासलेले होते, असे म्हणता येत नाही व कोणीही असे म्हटलेलेही नाही. पण, विनोबांच्या देहविसर्जनाचा अर्थ लावताना त्याला ब्रह्मनिर्वाणच का म्हणायचे असा प्रश्न मात्र उपस्थित केला जाऊ शकतो. अर्थात, विनोबांची स्थितप्रज्ञ अवस्था ज्यांनी पाहिली व अनुभवली त्यातला मी ही एक आहे. म्हणून स्थितप्रज्ञाचे अंतिम ब्रह्मनिर्वाणच असते या विषयी शंका बाळगण्याचे कारणही नाही. पण, म्हणूनच विनोबांच्या ब्रह्मनिर्वाणाचा अर्थ लावताना आवश्यक ती खबरदारीही घ्यायला हवी.

**समाधी अवस्था :**

विनोबांनी स्वतःविषयी म्हटले आहे, की गीतेवर प्रवचन करताना त्यांची समाधी लागली होती. 'गीताई' लिहितानाही त्यांची समाधी लागलीच होती. म्हणून, 'गीता प्रवचने' व 'गीताई' ही त्यांची सर्वोत्तम सेवा आहे. 'गीता' धर्मग्रंथ मानला तरी तो एका हिन्दुधर्माचाच नाही, सर्व धर्मांचा आहे. म्हणून, तो सर्वसमावेशक व सर्वमान्य आहे, अशी विनोबांची धारणा झाली होती. याचा प्रत्यय 'गीता प्रवचने' वाचल्यामुळे व 'गीताई'ला कंठस्थ केल्यामुळे नक्कीच येतो. समाधी अवस्थेत जी कृती घडते ती सर्वात्मक असते. म्हणून, ती सर्वात्मकतेची उपासनाच असते असे म्हणायला हवे. विनोबांची समाधी अवस्था त्यांच्या प्रवचनातून, बोलण्या वागण्यातून ही लक्षात घेता येऊ शकत होती. ते पदयात्रा करताना त्यांच्या पोटातला 'अल्सर' उफाळून यायचा व त्यांच्या पोटात दुखू लागायचे. म्हणून, चालताना मधेच थांबून पोट धरून ते बसतही असत. पण, काही वेळाने बरे वाटले की ते पुन्हा चालू लागत. कोणी विचारले की म्हणायचे "पोट दुखते म्हणून काय झाले पाय तर चालतात ना." तेव्हा अशी ही त्यांची आलिप्तता व आलिप्त राहूनच दुःख सहन करण्याची क्षमता व पात्रता इच्छित उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी स्वीकारलेली समाधीच म्हणायला हवी. त्यांना चक्कर यायची. चालताना तोल जाण्याची शक्यता असायची. म्हणून कोणाचा तरी हात धरून ते चालायचे. महादेवीताई, जयदेवभाई व बाळभाई या साधक सेवकांचे ते नित्यकर्मच असायचे. अन्य काहींनाही याची संधी मिळायची. मलाही ही संधी लाभलीच होती. विशेषतः प्रार्थना सभेच्या स्थानावर जाण्यासाठी मी अनेकदा त्यांचा हात धरून त्यांना घेऊन गेलो होतो. अनेकांना अशी संधी लाभायची. पण, कोणी राजकारण्यांनी ही संधी साधण्याचा प्रयत्न केला की ते म्हणायचे "माझा हात धरल्यामुळे तुम्हाला प्राप्त असलेले ऐश्वर्य नाहीसे होईल म्हणून सावध राहा." तेव्हा, विनोबांच्या समाधी अवस्थेचे विविध प्रकार मी पाहिले व जाणले आहेत. चन्द्रपूर जिल्ह्यात त्यांची मोटर वाहन यात्रा झाली. मी या यात्रेचा संयोजक होतो. ब्रह्मपूरी या तालुक्याच्या गावी हितकारिणी विद्यालयाच्या इमारतीत विनोबा रात्री थांबले होते. या दिवशी विनोबा संत नामदेवाच्या अभंगात रंगून मग्न झाले होते. म्हणजे ते नामदेवाच्या स्वाधीन झालेले होते. चालताना, आंघोळ करताना, शौच्याला गेले असताना, उठता बसताना अशा प्रत्येक वेळी त्यांच्या मुखावाटे नामदेवाच्या अभंगाच्या ओळी व कडवी बाहेर येत होती. त्यांची तल्लिनता पाहून मी काहीसा अचंबित झालो होतो. संध्याकाळी प्रार्थना सभेत जाताना त्यांचा हात धरून मी चालत होतो. त्याही वेळी संत नामदेव त्यांच्या मुखातून स्रवत होता. ही त्यांची तल्लिनता पाहून ती मला समाधी अवस्थेतलीच वाटली होती. विनोबा दारातून निघताना व दारात शिरताना महादेवीताई त्यांच्या डोक्यावर हात ठेवायच्या. अर्थात, त्यांनी वाकून दाराबाहेर पडावे किंवा वाकूनच दारात शिरावे म्हणून. विनोबा त्यांच्या समाधी अवस्थेत देहभान विसरत असत. याची जाणीव महादेवीताईच्या विनोबांच्या डोक्यावर हात ठेवण्याच्या कृतीतून मला व अन्य सर्वांनाच होत असे. विनोबांची समाधी अवस्था ही विविधांगी स्वरूपात पाहण्याची व अनुभवण्याची संधी ज्या अनेकांना मिळत असे त्यातलाच मी ही एक आहे.






**ब्रह्मनिर्वाणाची दिशा :**

विनोबांचे ब्रह्मनिर्वाण हे त्यांच्या समाधी अवस्थेत त्यांना परमोच्चता प्रदान करणारे होते, अशी माझी भावना झालेली आहे. म्हणजे समाधीतूनच ब्रह्मनिर्वाण साधले जात असावे किंवा ते शक्य होत असावे, अशी माझी या बाबतीतली धारणा झालेली आहे. यातूनच स्वेच्छा देह विसर्जन सहजपणे होत असावे असेही मला वाटते. म्हणून विनोबांच्या देह विसर्जनाचा अर्थ लावताना फक्त त्यात देहासक्ती सोडण्याचाच भाव येत नाही व यायला नको आहे, तर ब्रह्मात विलीन होण्याची समर्पणताही येते व यायला हवी, असे मानावे लागते. पण, हल्ली जो देहविसर्जनाला अर्थ दिला जातो आहे तो देहासक्ती सोडण्याचा मानला जातो. पण, वेदनेतून मुक्ती साधणेच त्यात अभिप्रेत आहे व असते हे लक्षात घ्यायला हवे. तेव्हा, देहासक्तीचा त्याग व वेदनामुक्तीचा ध्यास या दोन स्वतंत्र जाणिवा आहेत, असे यातून लक्षात येते. पण, नुसत्या देह त्यागाला आत्मघात करून घेण्याचाच प्रकार मानला जाईल. त्याला उदात्ततेची पुटेही चढवली जातात. म्हणून, आमरण उपोषण आदी प्रकार प्रचलित होऊ शकले व त्यांना प्रतिष्ठा मिळवून देण्याचा प्रयत्न केलाच जातो. आत्मशुद्धीसाठी केला जाणारा उपवास याला अपवाद मानता येईल. पण, ज्यांनी स्वेच्छा देह-त्यागाला आत्मोद्धाराच्या संदर्भातच जाणलेले असते त्यांनी ते आत्मदर्शनातले असावयाला हवे याचे भान ही ठेवायला हवे असते. तेव्हा, आत्मोद्धार व आत्मदर्शन करून घेण्याची इच्छा–आकांक्षा जरी महत्त्वाची मानली जाते, तरी ती स्थूल मनातली असून चालत नाही. या स्थूल मनामुळेच आमरण उपोषण आदी प्रकारांना अनेक बळी पडतात व यातून आत्मदर्शन तसेच आत्मोद्धार होत ही नसतो. अर्थात, समाधी अवस्थेतूनच जर देहासक्ती नाहीशी होत असेल व यामुळे देहत्यागाची सहज घटना घडतही असेल तर ते ब्रह्मनिर्वाणाच्या दिशेनेच नेणारीही असते व असू शकते असे म्हणता येईल.

**आत्मक्लेशातून आत्मभान :**

महात्मा गांधीनी सत्याग्रहाचे तत्त्वज्ञान स्वीकारले व त्यांनी त्याचा विकास केला. या सत्याग्रहाच्या संकल्पनेतच उदात्त हेतूसाठी देहासक्ती बाळगू नये, असे मानले गेले आहे. पण, याची अभिव्यक्ती निर्दोष असावी लागते असा दंडकही त्यांनी घालून दिला होता. याचे जे काही प्रयोग सर्वच पातळयांवर आजवर केले गेले त्यातल्या भान सुटलेल्या अवस्थेतून सत्याग्रहाच्या कृतीला अपेक्षित उदात्त हेतू बाजूला पडतो, असेच सामान्यतः प्रत्ययास येऊ लागले व अजूनही याचा प्रत्यय येतच असतो. हे सामान्यतः राजकीय कारणासाठी केल्या जाणाऱ्या सत्या-ग्रहाच्या बाबतीत घडत असते. कारण सत्याग्रहाचेही एक राजकारण असतेच व ते प्रतिपक्षावर दबाव आणणारे असते. कोणावरही दबाव आणणे सत्याग्रहाच्या शुद्ध स्वरूपाचे नसते व नाही. म्हणून त्याला सत्याग्रहाची कृती मानताही येत नाही. अर्थात, दबाव आणण्याच्या आग्रहाला सत्याचा आधार नसतो. कारण, असा हा दबाव राजकीय खेळीचा एक प्रकार असतो. म्हणून, अन्याय निवारण व न्याय स्थापना आदीच्या आकांक्षेतून राजकीय हेतूने प्रेरित झालेला सत्याग्रह केला जाऊ शकतो, या म्हणण्याला तसा अर्थ नसतो व नाही. पण, आत्मक्लेशाची अभिव्यक्ती सत्याग्रहातून होते व करता येऊ शकते ते मात्र मान्य करायला हवे. कारण, आत्म-क्लेशाची अभिव्यक्ती राजकीय हेतूने करता येत नाही. म्हणून, जे अशी अभिव्यक्ती करतात त्यांना ढोंगी म्हटलेही जाते. अर्थात, आत्मक्लेश हा आत्मीय भावातला असतो व असू शकतो. आत्मीयतेचे भान असण्याला आत्मभान म्हटले जाते. तेव्हा, आत्मभानासाठी आत्मक्लेश सहन करणे व प्रसंगी या क्लेशातच देह विसर्जन करावे लागले तर ती सत्याग्रहाची निर्दोष कृतीच मानायला हवी. अर्थात, आत्मक्लेशाच्या अभिव्यक्तीसाठी सत्याग्रह करणे म्हणजे सत्याग्रहाची निर्दोष कृतीच असते व आहे. तेव्हा, आत्मक्लेशाच्या अभिव्यक्तीचा सत्याग्रह देह विसर्जनाच्या अंतिम अवस्थेपर्यंत जाऊन पोहोचणार असेल तर तो एक आत्माविष्कारच म्हणता येईल व म्हणायला ही हवा.

**न्यायापेक्षा समाधान महत्त्वाचे :**

महात्मा गांधींनी सत्याग्रहाचे जे मूल्य स्वतःच्या सक्रियतेतून व कृतीतून निर्माण केले, त्यांतून त्यांचा अभिव्यक्त झालेला आत्माविष्कार आत्मानुभूतीतला होता. हा आत्मानुभाव ज्यांना होतो किंवा होऊ शकतो त्यांनी

अनुक्रमणिका






याच्या अभिव्यक्तीसाठी सत्याग्रहाची कृती करणे योग्यच म्हटले जाईल. पण, याचे अनुकरण मात्र करता येत नाही व करूही नये. जे अनुकरण करतात त्यांचा यातला आविष्कार आत्मानुभूतीतला असतो किंवा काय हे विशिष्ट निकष लावून तपासून घ्यायचे असते. कारण, प्रत्येकाची अनुभूती वेगळ्या स्वरूपाची असू शकते व ती ज्याची असते त्यात एक स्वतंत्रपणा असतो. म्हणून, ती अनुकरणातली म्हणता येत नाही व म्हणूही नये. पण, सर्वसामान्यपणे दिसते असे, की अनुकरण करणारेच अधिक प्रमाणात असतात व असू शकतात. म्हणून त्यातल्या त्यांच्या कृती सत्याग्रहाच्या नसतात व नसूच शकतात. त्यामुळे, अशा कृती निरर्थक व परिणाम शून्य ठरतात. सत्याग्रहाच्या परिणामाचा विचार करताना तो यशस्वी का अयशस्वी याचा निकष लावला जातो. आत्मक्लेशाला मात्र अशा निकषांवर अवलंबून ठेवणे योग्य नसते व नाही. म्हणून आत्मक्लेशाचे यश ज्यात असते ते स्थूल यशापशाहून निश्चितपणे वेगळेच असते व असू शकते या दृष्टीने एका प्रसंगात विनोबांशी झालेला संवाद मला या ठिकाणी लक्षात घ्यावासा वाटतो. मी माझ्या कल्पनेतला एक सत्याग्रह केला होता. अन्यायाचा प्रतिकार व न्यायाची स्थापना करणे अशी त्याची उद्दिष्ट्ये मानली गेली होती. पण, ती चुकीची कशी आहेत याचे उद्बोधन विनोबांनी मला केले होते. न्याय प्रस्थापित करणे आपल्या शक्ती बाहेरचे आहे. कारण ते ईश्वराच्या अधीन आहे व असते. म्हणजे न्याय ईश्वरच प्रस्थापित करू शकतो कारण, तो निर्दोष आहे. मनुष्य निर्दोष नाही. म्हणून तो फक्त समाधानच शोधू शकतो. समाधान शोधण्यात आवश्यक ती तडजोड करावी लागते. पण, समाधान हेच महत्त्वाचे मानून ते पत्करावेही लागते. न्याय स्थापना व समाधान पत्करणे यांत जो फरक आहे, तो मानवी प्रयत्नांच्या पराकाष्ठतेतल्या मर्यादांचे निर्धारण करीत असतो. या मर्यादेपलीकडे ईश्वरेच्छा असते व आहे. आपले प्रयत्न समाधान शोधण्याचेच असावयाला हवेत व तेच योग्य मानायलाही हवे. म्हणून, देहधारी माणसाला न्याय प्रस्थापनेचा आग्रह सोडायला हवा. या म्हणण्यात ईश्वरनिष्ठा बाळगावी असे मानले गेले आहे, असेच सर्वसामान्यपणे वाटेल. पण यापेक्षा मानवी प्रयत्नांच्या मर्यादांची जाण ठेवणे हे यात अपेक्षित आहे. यामुळे माणसांच्या प्रयत्नांची व्याप्ती समाधान शोधण्यापुरतीच मर्यादित असू शकते, याचे भान करून घ्यायला हवे असते. म्हणून, न्याय प्रस्थापनेच्या कल्पनेने भारावून जाऊन जेव्हा सत्याग्रहाची कृती केली जाते तेव्हा त्यात अहंतेचा आविर्भाव येतो व होत असतो. यामुळे अहंतेला फुलवीत राहण्याच्या कृतीलाच यश म्हणण्याची चूक यात होतही असते. तेव्हा, कोणत्याही समस्येचे समाधान शोधण्यातून जी मानवी शक्तीची मर्यादा निश्चित होत असते ती माणसाला आंतरिक शांती प्रदान करते. अर्थात, न्यायाच्या आग्रहातून जर सत्याग्रहाची कृती केली तर आंतरिक शांतीपासून वंचित व्हावे लागते. ईश्वरनिष्ठा आदी न बाळगताही सत्याग्रहाची कृती करण्यातून आंतरिक शांती प्राप्त करता आली तर हे सत्याग्रहाच्या कृतीचे यश मानले जाईल व मानले जायला हवे. यासाठी, स्थूल लाभाच्या कल्पनेत अडकून पडू नये. याची प्रख्यात उदाहरणे जी प्रत्यक्षातलीच आहेत त्यावर विचार करायला हवा. यामुळे हा विषय आणखीनच स्पष्ट होण्यास मदत मिळू शकेल.

**आत्मक्लेश स्थूल आणि सूक्ष्मातला :**

(स्व.) अप्पासाहेब पटवर्धन स्वातंत्र्याच्या चळवळीत रत्नागिरीच्या तुरुंगात सश्रम कारावास भोगत होते. तुरुंगात संडास सफाईचे श्रमकार्य त्यांना मिळावें, अशी मागणी त्यांनी तुरुंगाधिकाऱ्याकडे केली होती. पण ही त्यांची मागणी तत्काल मान्य होऊ शकली नव्हती. कारण, उच्चवर्णाच्या व्यक्तीला संडास सफाईचे निकृष्ट मानले गेलेले श्रमकार्य करण्यास लावणे तुरुंगाच्या नियमावलीला (जेल म्यॅनुअल) मान्य नव्हते. पण, अप्पांनी ध्यास सोडला नव्हता. म्हणून, त्यांनी या प्रश्नावर उपोषण करण्याचे ठरवले होते. महात्मा गांधींना हे कळल्यावर त्यांनी अप्पांचे समर्थन केलें व शेवटी अप्पांना संडास सफाईचे श्रमकार्य तुरुंगात राहून करता आले. यात अप्पांच्या संकल्पात दृढता होती. म्हणूनच ही दृढता जपण्यासाठी त्यांनी आत्मक्लेशाचा मार्ग अनुसरण्याचे ठाणले होते. या ठिकाणी सत्यसंकल्पाचे पावित्र्य रक्षणासाठी आत्मक्लेश सहन करायला हवे हे स्थापित झाले व यात अप्पा यशस्वीही झाले होते. स्थूलात जसे ते






यशस्वी झाले, तसे ते सूक्ष्मातही यशस्वी झाले. तुरुंगाच्या नियमात (म्यॅनुअल) ते बसवले गेले. म्हणून ते स्थूलातले यश मानले गेले. आत्मिक शांती यामुळे प्राप्त झाली म्हणून ते सूक्ष्मातलेही मानले गेले. अर्थात अप्पांचा उपवास सुरूच राहिला असता तर तो आत्मक्लेशाच्या अभिव्यक्तीतलाच असल्यामुळे यशस्वी झाला असे मानले गेलेच असते. म्हणून, स्थूल आणि सूक्ष्म या दोन्ही दृष्टीने या प्रसंगात आत्मक्लेशाचा सत्याग्रही मार्ग उजळून निघाला तो असाच उजळून निघत असतो.

साने गुरुजींनी पंढरपूरचे विठ्ठल मंदिर अस्पृश्य मानले गेलेल्यांसाठी खुले करावे या मागणीसाठी आत्मक्लेशाचा मार्ग स्वीकारून उपोषणाचा सत्याग्रह केला होता. यालाही महात्मा गांधीनी समर्थन दिले होते. साने गुरुजींचा सत्याग्रही उपोषणाचा मार्गही यशस्वी झाला असे मानले गेले. आत्मक्लेश सहन करण्याचा सत्याग्रही मार्ग स्थूल आणि सूक्ष्म या दृष्टीने यशस्वी ठरतोच. तो स्थूलात कोणत्याही कारणामुळे यशस्वी ठरू शकला नाही, तरी सूक्ष्मात यशस्वीच ठरतो, हे सिद्ध आहे. पण, साने गुरुजींनी अन्य एका प्रसंगात झोपेच्या औषधी गोळ्या प्रमाणाबाहेर प्राशन करून आपले देह विसर्जन केले. त्यातूनही आत्मक्लेशाची अभिव्यक्ती झालीच होती. अर्थात, यात आत्मक्लेश आत्मनाशाच्या दिशेने गेला. सत्याग्रही दर्शनाला हे मान्य होण्यासारखे नव्हते व नाही. कारण, आत्मक्लेशातून आत्मनाश करून घेण्यात वैफल्याचीच अभिव्यक्ती झाली आहे व हेच होत असते. अर्थात, ती आत्मक्लेशाच्या शुद्ध हेतूपासून अभिव्यक्तीला वेगळी पाडणारी व अशुद्ध होत असते. आत्मक्लेश सहन करण्यातून आत्मशांती प्राप्त करावयाची असते. यातून आत्मदर्शन करून घेण्याकडे जाण्याचा मार्ग मोकळा होऊ शकतो व होतो. पण, आत्मनाश घडण्याच्या परिस्थितीत आत्मशांती लाभण्याची शक्यता नसते व नाही म्हणून आत्मक्लेशाला आत्मनाशाकडे जाऊ देणे वैफल्याला कवटाळणेच होत असते व आहे. हे सानेगुरुजींच्या बाबतीत घडले असणे संभवते असे म्हणता येऊ शकते. पण, हा एक वाद विषय त्यावेळी झाला होता व अजूनही तो तसाच वादविषय आहे. तेव्हा, भावनिक उत्कटतेचे मूल्य मान्य करूनही ही उत्कटता आत्मनाशास कारणीभूत व्हावी, हे सत्याग्रही तत्त्वज्ञानाला मान्य होण्यासारखे नसते व नाही. तरी ही आत्मनाशाला उत्कटतेच्या पातळीवर ठेऊन त्याचे उदात्ती-करण व दैवीकरण केले जाते व शहीद बलिदानी या सदरातच ते समर्थनीय मानलेही जाते. तेव्हा, जे शहीद व बलिदानी होतात ते दीर्घकाळ जनमनाच्या जाणिवेत राहतात व त्याचे देव्हारेही निर्माण होतात. पण यामुळे आत्मक्लेशातून आत्मशांती मिळवण्याच्या दृष्टीने हे देव्हारे प्रेरक ठरत नाहीत व ठरत नसतात. ते फक्त कालाच्या उदरात निस्तेज होत लुप्त होतात. त्यांना आदर्शाच्या दृष्टीने चिरकालिन महत्त्व येत नाही व येत नसते.

**आत्मक्लेशातून आत्मशुद्धी :**

राजपुत्र गौतम राज्यत्याग करून बाहेर पडला. यावेळी त्याने पत्नी व पुत्राचा ही त्याग केला. पुढे हाच राजपुत्र गौतम 'बुद्ध' झाला. ज्याला ज्ञान प्राप्त झाले तो बुद्ध असा याचा अर्थ आहे. दुःख कशामुळे होते याचा शोध घेण्यासाठी गौतम सक्रिय झाला. ही सक्रियताच त्याला 'बुद्ध' होण्यास सार्थकी लागली. माणसाला संवेदना असते व आहे. म्हणजे संवेदना असते त्यालाच माणूस म्हटलेही जाते. संवेदनेमुळेच दुःखाची कारणे शोधण्यासाठी राजकुमार गौतम बाहेर पडला व त्याला ज्ञान प्राप्त झाल्यामुळे तो 'बुद्ध' झाला. या बुद्धाने दुःखाचे कारण शोधण्याचा प्रयत्न केला त्यातून दुःखाचे कारण, माणसाच्या इच्छा–आकांक्षेत आहे, हे त्याला कळले. इच्छा–आकांक्षा मनाच्या व्यापारात असते ज्याला मनोव्यापार म्हटले जाते. म्हणून, मनोव्यापारामुळे माणसाला जे मनोविकार जडतात त्याच्या निराकरणासाठी बुद्धाने एकदा उपवास आरंभला होता. उपवासातून मनोविकार नाहीसे होतात किंवा ते नाहीसे केले जाऊ शकतात, अशा एका समजूतीतूनच हा उपवास बुद्धाला करावा लागला होता. अर्थात, उपवासामुळे बुद्धाचे शरीर कृश झाले. तरीही मनोविकार नाहीसे होऊ शकले नाहीत, असा त्याला अनुभव आला. म्हणून आत्मक्लेशातून उपवास केल्याने मनोविकार नाहीसे होत नाहीत, ते नाहीसे करण्यासाठी विवेक व वैचारिकतेचे सामर्थ्य प्राप्त करावे लागते, हे बुद्धाच्या लक्षात आले. म्हणून, माणसाला प्रबुद्ध होता यायला हवे या निष्कर्षाप्रत बुद्धाला यावे लागले. माणसाचा प्रबुद्धपणा म्हणजे केवळ

बुद्धिचातुर्य नव्हे. बुद्धीच्या योगाने विवेकाधारित वैचारिक सामर्थ्य प्राप्त करणे जेव्हा शक्य होत असते तेव्हाच त्याला प्रबुद्ध म्हटलेही जाते. तेव्हा, जीवनाच्या कोणत्याही समस्यांचे आकलन विशिष्ट वैचारिक पातळी गाठल्याने करता येऊ शकते, असे यात मानले गेले आहे. यामुळे वैचारिकतेच्या अभावातून मनोविकारांना संधी व चालना मिळत असते, असा एक निष्कर्ष यातून काढता येऊ शकतो. माणसाच्या इच्छा-आकांक्षा प्रदूषित होतात त्यातून दुःखाना संधी उपलब्ध होत असते. म्हणूनच इच्छा व आकांक्षेचे शुद्धीकरण विवेकाधारित वैचारिक पात्रता निर्माण करूनच करता येऊ शकते व करायला ही हवे, हे यात मानले गेले आहे. तेव्हा, इच्छा-आकांक्षेच्या शुद्धीकरणातून आत्मक्लेश स्वीकारता आल्यास त्यातून आत्मशांती लाभणे शक्य होत असते व यामुळे आत्मक्लेश सहन करण्यातून आत्मशुद्धीच्या मार्गाने जाता येणे शक्यही होत असते. या दृष्टीने आत्मक्लेश सहन करणे महत्त्वाचे मानताही येते व मानायला हवे.

**आत्मदर्शनातले देहविसर्जन :**

आत्मक्लेशातून शांतीचा झरा प्रकट होऊ शकतो व होतो. कारण, त्यातून चित्ताला स्थिरता प्राप्त होत असते. यामुळे स्थिर चित्ताने माणूस अशांतीच्या वेगाला थोपवून धरू शकतो व धरतो. म्हणून हा शांतीचा झरा आत्मशांती प्रदान करणारा ठरतो. तेव्हा, सत्याग्रहात जेव्हा महात्मा गांधींनी आत्मक्लेशाला मान्य केले तेव्हा आत्मक्लेश सत्याचा शोध घेण्याच्या योग्यतेचा असतो व आहे, असे मानूनच हे त्यांनी केले असावे, असे वाटते. म्हणून, आत्मक्लेश आत्मनाशाच्याऐवजी आत्मशुद्धी करणारा असतो व असू शकतो, असे एक मूल्य यातूनच प्रस्थापित होऊ शकले आहे. हेच मूल्य शांत चित्ताने देहविसर्जन करण्यास माणसाला प्रवृत्तही करीत असते. म्हणून, या संदर्भातले देह विसर्जन हे समाधी अवस्थेतले असते व आहे किंवा ते तसेच असू शकते, असे म्हणायला हवे. कारण, देहासक्तीतून मुक्त झाल्यानेच देह विसर्जनाची प्रेरणा माणसाला मिळत असते, हे यात स्पष्टच आहे. तेव्हा, देह धारण करून असलेल्या व्यक्तीला जगण्याची इतिकर्तव्यता संपल्याचे लक्षात आल्यास ती व्यक्ती जर शांत चित्ताने देह विसर्जन करण्यास प्रवृत्त होणार असेल किंवा झाली असेल तर ते आत्मसाक्षात्कारातलेच म्हणायला हवे. म्हणून, माणसाची समाधी अवस्था ही जगण्याची मौलिकता प्रदान करणारी असते, असे जे यातून लक्षात येते, त्यावर विश्वास ठेवायला हवा.

**उपसंहार :**

स्वेच्छा देह विसर्जनाचे महत्त्व नक्कीच आहे. पण, त्याचा हेतू शुद्ध असायला हवा. यामुळे केवळ देहासक्तीचा त्याग करणेच पुरेसे ठरत नाही. आत्मदर्शनाची ओढ त्यात असायला हवी. किंबहुना आत्मदर्शनाच्या ओढीतूनच देह विसर्जन सहजपणे व्हावयाला हवे. आत्म-दर्शनाची ओढ हा एक साक्षात्कार असतो व आहे. तो कोणत्याही प्रयत्नापलीकडचा असतो हे यातले वैशिष्ट्य आहे. म्हणून तो सहज प्राप्त वृत्तीचा पोषक असतो. तेव्हा, देहविसर्जनाचे शुद्ध स्वरूप हे प्रयत्नापलीकडच्या सहजप्राप्त वृत्तीतलेच असते व असावेही लागते. विनोबांच्या देहविसर्जनाचा अर्थ मला उलगडला आहे असे मी म्हणत नाही. पण, त्यांच्या देह विसर्जनात जे चैतन्य मला खुणावले होते ते अजूनही खुणावत असते. अर्थात, ते देहासक्तीच्या विळख्यातून सोडवणारे वाटले होते. अजूनही ते तसेच वाटते. म्हणून, यात सुखावण्याचे क्षण गाठता येतात व देहभान सोडून उत्स्फूर्तपणे जगण्याची स्फूर्ती हे क्षण देतात.



# एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्रीय स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्या

— प्रा. डॉ. रोहिणी तुकदेव

लक्ष्मीबाई टिळक यांच्या 'स्मृतिचित्रे' या आत्मकथनामध्ये एक आठवण आहे – मी एक सामाजिक कादंबरी लिहिण्यास घेतली होती. मला लिहिता लिहिता एखादे जोडाक्षर मध्येच अडवी; मग पुस्तकांची उलटापालट करून तो शब्द कोठे आढळला म्हणजे माझी गाडी रूळावर येई. एक दिवस असे माझे कादंबरीलेखन अगदी जोरात चालले असता मध्येच घोडे अडले.

मला मनुष्य काही काढता येईना. मी हातांशी होती नव्हती तेवढी पुस्तके उलथी पालथी केली, पण मनुष्य कोठे सापडेना. मी चिंतातुर होऊन बसले आहे, सभोवार पुस्तके अस्ताव्यस्त पडलेली आहेत, घरात काम हाका मारीत आहे, अशा वेळी ठोंबरे घरात आले. हा सारा देखावा पाहून ते म्हणाले,

"लक्ष्मीबाई, तुम्ही अशा का बसला? काही हवे आहे का तुम्हाला?"

"काय करू रे! मला हवा मनुष्य. इतकी उलथापालथ केली पण तो कुठे सापडत नाही."

ठोंबरे माझ्यापुढे छातीवर हात ठेवून उभा राहिला.

"कशाला एवढी उलथापालथ करता? हा पहा इथे आहे मनुष्य. आणखी हवे असतील तर जरा बाहेर या. हवी तितकी मनुष्ये दाखवितो. काही तोटा नाही. अहो, साऱ्या जगात मनुष्येच मनुष्ये. माणसांना काय तोटा?"

"अरे, मला जगातील नकोत रे माणसे, मला पुस्तकातला मनुष्य पाहिजे."

मग आम्ही दोघे खूप हसलो. ठोंबऱ्यांनी मला मनुष्य काढून दिला. एक दिवस माझी ती कादंबरी ठोंबऱ्यांना वाचायला सांगितली. त्यांनी ती वाचून तिच्यावर खाली दिलेला अभिप्राय लिहून ठेवला.

अभिप्राय : सदर कादंबरी
मी संप्रूण वाचली. आशी
कादंबरी समंध माराष्ट्र
भाशेत दुसरी दीसणार नाही.
'त्रिंबक बापुजी ठोंबरे'
आहामंद नग्र
तारीख. पदरा ज्यून ऐकोणीशचउदा
जाइरात
नावें नोंदवा नावे नोंदवा नावे नोंदवा
अप्रतिम ग्रंथ अप्रतिम ग्रंथ अप्रतिम ग्रंथ
ही संधीपून्हायेणारनाही

वरील अभिप्रायाचे पान अजून मजजवळ आहे. कादंबरीला नाव ठेवले नव्हते, पण वर ठोंबऱ्यांनी मोठ्या अक्षरात 'लक्षुम्बाईची कादंबरी' असे लिहून ठेवले होते. ते पान काळाच्या उदरात गडप झालेले आहे. त्या गोष्टीला आता एकवीस वर्षे झाली. आता मला पुष्कळच चांगले लिहिता येते. पण तेव्हाचे माझे लिखाण म्हणजे पोरांच्या थट्टेचा एक विषय होता.[१]

या आठवणीवरचे थट्टेचे आणि विनोदाचे झिरझिरीत आवरण दूर केल्यावर काय दिसते? माणूस किंवा माणसाचे समग्र जीवन हाच कादंबरीचा प्रमुख विषय असतो. आपले चुलीजवळचे क्षेत्र सोडून कधीच बाहेर न पडलेल्या स्त्रियांना तो कसा आत्मसात करता येणार? आणि मग त्यात दिसते ती म्हणजे कादंबरी तरी कशी लिहिता येणार? दुसरी एक अधिक गंभीर बाब म्हणजे त्या काळी स्त्रियांचं लिहिणं–वाचणं हा थोरामोठ्यांच्याच नव्हे तर लहान मुलांच्याही टीकेचा विषय झाला होता. सामाजिक कादंबरी लिहायला लक्ष्मीबाईंनी सुरुवात तर केली; पण झालेल्या टिंगलीमुळे ती कादंबरी पूर्ण झाली नाही. एवढेच नव्हे तर ज्यावर ठोंबऱ्यांनी मोठ्या अक्षरात 'लक्षुम्बाईची कादंबरी' असे लिहिले होते ते पानही काळाच्या उदरात गडप झाले. स्व. लक्ष्मीबाईंनी हा प्रसंग मोठ्या खेळकर पद्धतीने सांगितला आहे. त्यात कोठेच कडवटपणा अंशभागही नाही, की तक्रार नाही. पण हे लक्षात घेतले पाहिजे की, स्त्रिया जेव्हा नव्याने लिहा–वाचायला शिकू लागल्या तेव्हाच्या कुटुंबांतील ते

प्रातिनिधिक चित्र आहे. लक्ष्मीबाई जिद्दी होत्या; त्यामुळे त्या शिकल्या आणि पुढे त्यांनी उत्कृष्ट दर्जाची साहित्य-निर्मिती केली. पण कितीतरी स्त्रिया अशा असतील की ज्यांनी, थट्टेला किंवा पुढे जाऊन बोचऱ्या टिंगलीला घाबरून लिहिणे सोडून दिले असेल. लक्ष्मीबाईंच्या या हकीकतीवरून १९ व्या शतकात स्त्रियांनी कादंबरी लिहिणे ही किती मोठी अडथळ्यांची शर्यत होती हे सहज लक्षात येते.

१९ व्या शतकात एकंदर स्त्रियांचे जीवनच परस्वाधीन होते. आपल्या आयुष्याबद्दलचा कोणताच निर्णय त्या स्वतः घेऊ शकत नसत. आयुष्याचा अर्थ त्यांच्या लेखी केवळ जिवंत राहणे एवढ्यापुरताच मर्यादित होता. गोविंद बाबाजी जोशी यांनी आपल्या 'माझे प्रवासाची हकीकत' या पुस्तकात एक हकीकत दिली आहे, '... गुजराथेत एका बाईचा नवरा मरण पावला, तेव्हा आता जगात राहण्यापेक्षा मरून जाणे चांगले असे समजून ती प्रेताबरोबर सती जाण्यास सिद्ध झाली. चिता रचून ती आत प्रवेश करून बसली. आणि काही कर्म होऊन आता अग्नी लावणार इतक्यात वरती पाऊस पडल्यामुळे नदीस एकदम लोंढा आला आणि ती चितेसह त्यात वाहून गेली. इकडे गावकरी लोकांस वाटले की, त्या पतिव्रतेने जळू नये म्हणून जलदेवतेने पतीसह तीस पोटात घेतले. म्हणून विस्तीर्ण देऊळ तिचे त्याजागी बांधून पूजा यात्रा व आसपासचे प्रांतातून या देवीस मोठमोठाले नवस फेडण्याकरिता लोक येऊ लागले. आणि मोठे देव्हारे माजले. पुढे पंचवीस तीस वर्षांनी तेथील एक मनुष्य परगावी गेला असता त्याची व एका जख्ख म्हातारीची गाठ पडली. ती व तिची पोरे अन्नाविण मरत होती. या गृहस्थाने तिला व तिने या गृहस्थाला ओळखिले. नंतर ती सांगू लागली की, बाबा, आमचे गावी मी असता माझा नवरा मेला तेव्हा मी वाहून आले. येथील मांगाने लोंढ्यातून मला घरी नेऊन वागविले. हल्ली त्याचे पोटची मला चार-पाच पोरे आहेत. मला तो वारंवार मारहाण करतो. धड अन्नही देत नाही काय करू? नशीब माझे.'[२]

१९ व्या शतकातील स्त्रियांच्या अवस्थेचे यथास्थित भान देणारी आणि स्त्रियांबद्दलच्या आपल्या समाजाच्या मानसिकतेचे प्रातिनिधिक दर्शन घडविणारी ही हकीकत आहे. इतकी टोकाची परवशता आणि – परस्वाधीनता वाट्याला आल्यामुळे स्वाभाविकपणेच स्त्रियांमधील कलाभिव्यक्ती खुंटून गेली होती. धर्माने मोक्षाचा आणि विद्येचा अधिकार नाकारला, पुरुषसत्ताक व्यवस्थेने घरात दुय्यमत्व दिले आणि घराबाहेर पडण्याचे स्वातंत्र्य नाकारले. सामाजिक रूढी, परंपरा आणि अनेक सामाजिक संस्था यांनी तर तिला अगदी जखडूनच टाकले. अशा परिस्थितीत आपले मत, आपले विचार, आपल्या भावना व्यक्त करणे हेही एक साहसाचे काम होते. ती एक बंडखोरी होती आणि सत्तेच्या असमतोलाविरुद्ध करावयाच्या संघर्षाची नांदी होती. १९ व्या शतकात काही स्त्रियांनी असा संघर्ष केला. स्त्रियांचे कादंबरीलेखन हेही अशा संघर्षाचे रूपच म्हणावे लागेल.

एकोणिसाव्या शतकात, अगदी नेमकेपणाने सांगायचे तर, १८९७ अखेर भाषांतरित व स्वतंत्र अशा दोन्ही मिळून सुमारे २९३ कादंबऱ्या प्रकाशित झाल्या.[३] त्यापैकी अनेक कादंबऱ्यांमध्ये स्त्रियांच्या जीवनाचे, त्यांच्या समस्यांचे चित्रण आढळते. त्या काळातील कादंबरीचा 'स्त्री' हा केवळ चित्रण विषय होत असे नाही तर; अत्यल्प संख्येने का होईना पण, स्त्रियांनी कादंबरी लेखन ही केलेले आढळते. १९ व्या शतकात स्त्रियांनी लिहिलेल्या दहा कादंबऱ्यांची नोंद आढळते. त्यापैकी दोन भाषांतरित आहेत. उरलेल्यां-पैकी काशीबाई देसाई यांची 'आईची मालिनी' ही कादंबरी उपलब्ध नाही ती वगळता, सर्व कादंबऱ्यांचा विचार या लेखात अभिप्रेत आहे.

१९ व्या शतकात प्रकाशित झालेल्या कादंबऱ्यांमधून वेगळ्या करून, केवळ स्त्रियांच्याच कादंबऱ्यांचा स्वतंत्र-पणे विचार का करावयाचा असा एक प्रश्न निर्माण होणे शक्य आहे. ख्रिस्ती मिशनऱ्यांनी आणि ब्रिटिशांनी आणि पुढे त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन काही समाज-सुधारकांनी एतद्देशीय सर्व जाती धर्मांच्या पुरुषांसाठी व स्त्रियांसाठी शाळा सुरू केल्या. त्यापूर्वीच्या काळात केवळ तालेवारांच्या किंवा सरदारदरकदारांच्या घरातील स्त्रियांना लिहिता-वाचता येत होते. असे उल्लेख आढळतात.[४] पत्रव्यवहारा-पलिकडे त्यांच्या लेखनाचे अन्य प्रकार आढळत नाहीत. १९ व्या शतकातील ब्रिटिशांच्या शैक्षणिक धोरणामुळे मात्र यात बदल झाला. शिकलेल्या स्त्रियांनी

शैक्षणिक, साहित्यिक, सांस्कृतिक तसेच राजकीय, धार्मिक क्षेत्रातही प्रवेश केला. पंडिता रमाबाई, रमाबाई रानडे, काशीबाई कानिटकर, कार्निलिया सोराबाजी, सावित्रीबाई फुले, ताराबाई शिंदे, शेवतांबाई निकम्बे अशी काही नावे यासंदर्भात सहज सांगता येतील. शिकलेल्या स्त्रियांनी केलेले कादंबरीलेखन हे त्यांच्या सांस्कृतिक क्षेत्रातील प्रवेशाचे द्योतक आहे. या स्त्रिया जरी तत्कालीन व्यवस्थेच्या परिघात वावरत होत्या तरी अनुभवांकडे आणि जगाकडे बघण्याचा त्यांचा दृष्टिकोण पुरुषांपेक्षा वेगळा होता. त्यामुळेच वरवर पाहात जरी; त्यांनी लिहिलेल्या कादंबऱ्या वेगळ्या दिसल्या नाहीत तरी बारकाईने आणि चिकित्सकपणे पाहिले तर त्यांच्या कादंबऱ्यांमध्ये वेगळेपणा दिसून येतो. म्हणूनच १९ व्या शतकातील स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांचा स्वतंत्रपणे विचार करण्याची आणि त्यांची वैशिष्ट्यपूर्णता अधोरेखित करण्याची आवश्यकता आहे.

एकोणिसाव्या शतकात स्त्रियांनी लिहिलेल्या मराठी कादंबऱ्यांचे स्थूलमानाने, परदेशी स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्या व महाराष्ट्रीय स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्या असे दोन भाग कल्पिता येतात. या शिवाय कृपाबाई सत्यनाथन (कमला – द स्टोरी ऑफ अ हिंदू चाइल्ड वाइफ–१८९४) (सगुणा, अ स्टोरी ऑफ नेटिव्ह ख्रिश्चन लाइफ, १८९५) आणि शेवंताबाई निकम्बे (रत्नाबाई, अ स्केच ऑफ अ बॉम्बे हायकास्ट हिंदू यंग वाइफ, १८९०) यांनी इंग्लिश भाषेत कादंबऱ्या लिहिल्या. त्यांच्या कादंबऱ्यांत चित्रित झालेले जीवन मराठी आहे. भौगोलिक परिसर महाराष्ट्राचा आहे पण भाषा इंग्रजी आहे. एका अर्थाने त्या 'मराठी' कादंबऱ्याच आहेत. या सर्व प्रकारच्या कादंबऱ्यांचा क्रमशः विचार करू.

**अ) युरोपियन स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्या –**

एकोणिसाव्या शतकात स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांपैकी तीन कादंबऱ्या युरोपियन स्त्रियांनी लिहिल्या आहेत. पैकी श्रीमती फेरार यांनी लिहिलेली 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' ही मराठीतील पहिली उपलब्ध कादंबरी आहे. या कादंबरीचे लेखन त्यांनी शालेय पाठ्यपुस्तकाची गरज म्हणून केले. राघोजी जाधव ही या कादंबरीतील मध्यवर्ती व्यक्तिरेखा आहे. सालस, मेहनती अशा या कुणब्याची जीवनकथा या कादंबरीत वर्णिली आहे.

राघोजी या कुणब्याच्या जीवनकथेचे चित्रण करताना, लेखिकेने तत्कालीन सामाजिक वास्तवाचे दर्शन घडविले आहे. 'सिंहस्थात नाशिक–यात्रा करण्याची रीत', 'यात्रेकरूंना लुबाडणारे, लुटणारे–भामटे, पटकीची साथ आणि त्याला बळी पडणारे लोक, नवस, दंडवत घालण्याची प्रथा अशा प्रकारचे सामाजिक वास्तव कथानकाचा भाग म्हणून चित्रित झाले आहे.'

काही घटना–प्रसंगांची वर्णने दृष्यात्मक परिणाम साधणारी आहेत. राघोजीची मध्यवर्ती व्यक्तिरेखा, अनेक पात्रे, त्यांच्या परस्परसंबंधांतून निर्माण होणारे विविध प्रसंग, छोट्या–छोट्या उपकथा, स्थळ–काळाचा तुलनेने मोठा पैसा आणि या सगळ्याने मिळून तयार होणारे दीर्घ, कल्पित कथानक असे रूप धारण करणारी ही कादंबरी शालेय पाठ्य–पुस्तकांची गरज म्हणून लिहिली गेली. त्यामुळे साहजिकच, बटाट्याची लागवड कशी करावी, उसाची लागवड कशी करावी, साखर कशी तयार करावी याचे शिक्षण देणारी माहिती त्यात संवादरूपाने येते. पण पुस्तकाचे स्वरूप केवळ 'गोष्टीरूप माहिती' असे नाही. माहिती ग्रंथित करण्याच्या सूत्राखेरीज आणखी कितीतरी उल्लेखनीय बाबी त्यात आहेत.

लेखिका वासाहतिक वर्चस्वाच्या भूमिकेतून भोवताल पाहात असल्यामुळे, पाद्री अथवा ख्रिस्ती धर्मोपदेशक साहेब, काळा फिरंगी मुलगा (म्हणजेच एतद्देशीय ख्रिश्चन मुलगा) यांची चित्रणे परोपकारी, सर्वांचे भले चिंतणारे, कामाची योग्य बूज ठेवून त्याचा योग्य मोबादला देणारा, हुशार, बुद्धिमान अशा उजळ रंगात आहेत तर; एतद्देशीय हिंदू लोक अडाणी, अंधश्रद्ध, चोर, भामटे आहेत. राघोजी हा नायक वेगवेगळ्या अनुभवांतून जाऊन पुढे पाद्र्याच्या उपदेशाने प्रभावित होतो, साहेबाचे म्हणणे ऐकतो आणि अखेर सुखी होतो. सुखी होण्याचे गमक काय तर, गावी जाऊन विलायती – नांगराने नांगरट करतो, विलायती ऊसाचे नगदी पीक घेतो, साखर तयार करतो आणि ती विकून पैसा करतो. संताजीच्या विधवा मुलीशी लग्न करून सुखाचा संसार करतो. इथे राघोजीची संपूर्ण जीवनशैलीच बदललेली दिसते. या जीवन शैलीतील बदलातून वासाहतिक वर्चस्वाची भावना स्पष्टपणे व्यक्त

होते. कथानकाच्या ओघात, जिथे संधी मिळेल तेथे इंग्रज राज्यकर्त्यांच्या परोपकारी कृत्यांचे, सुधारणांचे निवेदन येते. राघोजीला ख्रिश्चन करण्याचा पर्याय लेखिका स्वीकारीत नाही, पण ओघाओघाने ख्रिश्चन धर्माचे माहात्म्य आणि हिंदू धर्मातील अनिष्ट रुढी, प्रथा यांचे वर्णन लेखिका करते.

'यात्रेकऱ्याचा वृत्तांत'च्या जोडीने त्याच वर्षी अभ्यास-क्रमाचा भाग म्हणून वाटसराची गोष्ट (राघो नारायण देवळे) आणि जागती ज्योत (रामचंद्र अमृत दुगल) ही क्रमिक पुस्तके निघाली. या तिन्हींचे स्वरूप तपासून पाहिले की सहज लक्षात येते की, 'वाटसराची गोष्ट' आणि 'जागती ज्योत' यात माहिती देण्याचे सूत्र म्हणून केवळ 'कथे'चा वापर केला आहे. 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' मात्र 'सूत्ररूप कथे'च्या पलीकडे जाऊन कादंबरी सदृश रूप धारण करते. मराठीतील पहिली कादंबरी म्हणून जिचा उल्लेख केला जातो. त्या यमुना पर्यटनचे (बाबा पद्मनजी - १८५७) रूप, गुणात्मक दृष्टीने 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' सारखेच आहे. 'क्रमिक पुस्तक' असे लेबल नसते तर कदाचित 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' ही मराठीतील पहिली उपलब्ध कादंबरी ठरली असती. पहिली उपलब्ध भाषांतरीत कादंबरी 'यात्रिक क्रमण'[५] ही सुद्धा 'यात्रेकऱ्याचा वृत्तांता'नंतर प्रकाशित झाली आहे, हे विशेष.

याच काळातील युरोपियन लेखिकेने लिहिलेली आणखी एक कादंबरी म्हणजे 'फुलमुनी आणि करुणा' (१८५९). ही कादंबरी बंगालीतील पहिली कादंबरी आहे असे काही लोक मानतात.[६] ही कादंबरी हॅना कॅथरिन मुलेन्स यांनी लिहिली. ज्ञानोदयमध्ये याबद्दल काहीशी वेगळी माहिती आहे. रेवरंड लाक्रोई यांची कन्या मलंज-मड्म हिने प्रथम हा ग्रंथ इंग्रजीत रचला मुंबईतील मड्मांनी त्याचे मराठी भाषांतर केले.[७] अशी माहिती ज्ञानोदयात मिळते. प्रथम बंगाली नंतर इंग्रजी आणि नंतर मराठी असा या कादंबरीचा प्रवास झाला असावा. या कादंबरीचे कथानक उत्तर हिंदुस्थानातील गंगातीरावरील एका शहरात घडते. एक मॅजिस्ट्रेट त्या शहरात नोकरीच्या निमित्ताने जातात. त्यांची पत्नी एतद्देशीय लोकांच्या वस्तीत त्यांना भेटण्यास व त्यांची वास्तुपुस्त करण्यास जात असते. अशाच एका प्रसंगी, ख्रिस्ती झालेल्या फुलमनीचे स्वच्छ घर, निर्मळ राहणी व सुखी संसार पाहून तिला समाधान वाटते. तिथे तिला फुलमनीची मैत्रीण करुणा भेटते. व्यसनी नवरा, वाईट संगत लागलेला मुलगा, आळशीपणा आणि अस्वच्छता यामुळे करुणा गांजलेली असते. युरोपियन स्त्री करुणेला काम देते व कामाचा मोबदला म्हणून पैसे देते. तोंड वेंगाडून पैसे मागण्यापेक्षा श्रम करून पैसे मिळविण्याचे महत्त्व तिला समजावून सांगते. करुणेचा मुलगा चोरी करून पळून जाण्याच्या प्रयत्नात तळ्यात पडतो आणि बुडून मरतो. युरोपियन स्त्रीच्या सांत्वनाने आणि उपदेशामुळे करुणा ख्रिस्ती धर्माकडे ओढली जाते. त्यानंतर तिच्यात चांगले बदल होतात व तिचे भले होते. काही काळानंतर नर्सिंगच्या शिक्षणासाठी परगावी राहिलेल्या फुलमुनीच्या मुलीचे सुशिक्षित, कर्तबगार मुलाशी लग्न होते. युरोपियन स्त्रीच्या घरी आया म्हणून काम करणारी आणि सतत तिच्या बरोबर असणारी मुसलमान आया हे सर्व पहात असते. या सगळ्याचा तिच्यावर अनुकूल परिणाम होऊन ती ख्रिश्चन धर्म स्वीकारते.

ख्रिश्चन झालेल्या फुलमुनीचा सुखी, प्रसन्न संसार आणि ख्रिश्चन न झालेल्या करुणेचा दरिद्री, अस्वच्छ, फाटका, संसार यातील विरोध चित्रित करून लेखिकेने ख्रिश्चन धर्म स्वीकारण्याचे व्यावहारिक महत्त्व स्पष्ट केले आहे, उपदेशाचे प्रसंग कल्पून ठिकठिकाणी बायबल-मधील वचनेही दिली आहेत. व्यसनीपणा, आळशीपणा आणि अस्वच्छता या हिंदुसमाजातील लोकांच्या दोषांवर कादंबरी नेमकेपणाने बोट ठेवते. ब्रिटिश लोकांना आपला समाज कसा दिसत होता, हे यातून स्पष्ट होते.

या कादंबरीवरील ज्ञानोदयामध्ये प्रसिद्ध झालेल्या अभिप्रायात 'शाब्बाथाचे महत्त्व, दारु व कैफ यांचा निषेध, यात असल्यामुळे आम्हांस आनंद वाटला. परंतु उपदेशास 'द्वाड पाला' असे नाव दिल्यामुळे मात्र खेद वाटला.' असे नमूद केले आहे. हा ग्रंथ म्हणजे मराठी भाषेला अमूल्य असा लाभ आहे. शाब्बाथ शाळांच्या पुस्तकसंग्रहात तो नेहमी ठेवला पाहिजे आणि अशा प्रकारचे आणखी शंभर ग्रंथ झाले पाहिजेत अशी अपेक्षा वरील अभिप्रायात व्यक्त केली आहे.[८]

कादंबरीतील निवेदन 'स्त्री' करते. आणि स्त्रियांच्या

अनुक्रमणिका






जीवनचित्रणाला कादंबरीत महत्त्वाचे स्थान आहे. कादंबरीचा रोख धर्मप्रसाराकडे असल्यामुळे स्त्रिया व्यक्ती म्हणून उभ्या राहात नाहीत. आणि घटना प्रसंगातही कृत्रिमता येते. 'तात्पर्य' सांगणारे हे कथानक शाळकरी पातळीवरच रहाते.

'फुलमुनी आणि करुणा' प्रमाणेच 'पुष्पकरंडक' ही अनुवादित कादंबरी आहे. लेखिकेने आपल्या पूर्ण नावाचा निर्देश न करता केवळ एम. बी. असा संक्षिप्त निर्देश केला आहे. मेरी भोर यांनी ही कादंबरी 'परलोकवासिनी आवडाबाई भिडे' या मैत्रिणीस अर्पण केली आहे. कादंबरीचे कथानक पुढीलप्रमाणे आहे —

सुवर्णपुरीत प्रतापराव नावाचा एक सरदार रहात असे. त्याच्या पदरी आनंदराव नावाचा एक माळी असतो. त्याला शांता नावाची एक मुलगी असते. लहानपणीच तिची आई निवर्तल्यामुळे तिचे सर्व संगोपन आनंदराव करतो. ती जसजशी मोठी होते तसतशी बापाला व्यवसायात मदत करू लागते. लहान–मोठ्या प्रसंगी, काम करताना आनंदराव आपल्या मुलीला उपदेश करीत असे. तिला त्याने नीट वळण लावून सद्‌गुणी बनविले होते. एकदा प्रतावरावांच्या मंजुळा नावाच्या एकुलत्या एक मुलीचा वाढदिवस असतो. तेव्हा शांता तिला फुलांनी भरलली उत्कृष्ट करंडी भेट म्हणून देते. ती करंडी आनंदरावाने स्वतः बनविलेली असते व त्यावर मोठ्या कौशल्याने मंजुळेचे नाव विणलेले असते. साऱ्यांनाच करंडी फार आवडते त्यामुळे खुश होऊन प्रतापरावांची पत्नी शांतेला एक मोठा शालू बक्षीस देते. तिला शालू मिळाला ही बाब चिमाऊ नावाच्या दासीला मुळीच रूचत नाही. आपली नोकरीच न जाणो ही मुलगी पटकावेल अशी भीती तिला वाटते. कर्मधर्मसंयोगाने त्याच वेळी मंजुळेच्या आईच्या मेजावरची २,००० रू. ची हिऱ्याची अंगठी नाहीशी होते. ती खरे तर एका पाखराने उचलून नेलेली असते; पण चिमाऊला ही अनायसे संधी सापडते. ती अंगठीचा वहीम शांतेवर ढकलते व न्यायाधिशापुढे खोटी शपथ घेते. पोलिस आनंदराव व शांता या दोघांना पकडतात. कबुलीजबाब देण्यासाठी त्यांचा छळ केला तरी ते दोघे बधत नाहीत. चिमाऊच्या साक्षीवर भरंवसा ठेवून न्यायाधीय त्या दोघांना हद्दपार करतात. ते दोघे फिरत फिरत एका खेड्यात पोहोचतात. तिथे एक शेतकरी त्यांना आश्रय देतो. शेतात राबावे, फावल्या वेळात टोपल्या विणाव्या व फुलझाडांची निगा राखावी असा त्यांचा दिनक्रम चालतो. पुढे काही दिवसांनी आनंदराव आजारी पडतात व त्यातच त्याचे प्राणोत्क्रमण होते. पुन्हा शांता एकटी पडते ती रोज आपल्या वडिलांच्या समाधीजवळ जाई, तिला हार अर्पण करे व आठवणींना व दुःखाला अश्रूवाटे वाट मोकळी करून देई.

इकडे सुवर्णपुरीत बागेतील एक झाड तोडीत असताना झाडाच्या ढोलीत पक्षाचे एक घरटे सापडते व त्यात ती अंगठी सापडते. तेव्हा मंजुळा व तिच्या कुटुंबियांना सत्य समजते. आनंदराव शांता यांना विनाकारण शिक्षा झाली या गोष्टीबद्दल वाईट वाटून ते त्या दोघांचा शोध घेऊ लागतात. फिरत फिरत ते नेमके शांता रहात असते, त्या गावी पोहोचतात.

शांताला ज्या शेतकऱ्याने आश्रय दिलेला असतो, त्याच्या मुलाचे लग्न झाल्यावर, त्यांची बायको शांतेच्या चारित्र्यावर संशय घेऊन तिला घरातून हाकलून काढते. जाण्यापूर्वी पित्याच्या समाधीचे दर्शन घ्यावे म्हणून ती तिथे जाऊन करुणस्वराने आळवणी करू लागते. योगायोगाने मंजुळा तेथे जाते. दोघींची भेट होते. प्रतापराव शांतेला सुवर्णपुरीस घेऊन जातात. तो शेतकरीही त्यांच्याबरोबर जातो. जी बाग तिच्या बापाकडे खंडाने होती, ती ते शांतेला बक्षीस म्हणून देतात. तिथे शांता आनंदरावाची समाधी बांधते. शेतकऱ्याच्या सुनेने कोणा व्यापाऱ्याजवळ ठेवलेला पैसा त्याचे दिवाळ वाजल्यामुळे बुडतो. त्या धक्क्याने तिचा अंत होतो. चिमाऊ शांतेची माफी मागते व शांता सुवर्णपुरीत पित्याचे चिरस्थायी स्मारक करून शांततेने राहू लागते.

असे चटकदार कथानक या कादंबरीला आहे. भाषांतर सुरेख जमले आहे. संधी मिळेल त्या ठिकाणी नित्युपदेश करून ख्रिश्चन धर्माची महती सांगितली आहे. क्षमाशीलता, उदात्तता, सात्त्विकता व ईश्वरनिष्ठा ही ख्रिस्ती धर्माची तत्त्वे आहेत, ती प्रत्येकाने अंगिकारून सुख प्राप्त करावे असा उपदेश ठसविण्याचा प्रयत्न केला आहे.

'यात्रेकऱ्यांचा वृत्तांत', 'फुलमुनी आणि करुणा',

'पुष्पकरंडक' या कादंबऱ्यांच्या लेखिका राज्यकर्त्या वर्गातील होत्या. जित समाजाला आपण सुधारणार आहोत अशी वर्चस्वाची भूमिका घेऊन त्यांनी लेखन केले आहे. राजकीय वर्चस्व, धर्मप्रसाराची प्रेरणा आणि शिक्षिकेची भूमिका यांचा एकत्रित परिणाम त्यांच्या कादंबऱ्यांच्या रूपावर झालेला दिसून येतो. सामाजिक समतेचा त्या पुरस्कार करतात पण; त्याचवेळेला आपण इथल्या लोकांच्यापेक्षा श्रेष्ठ आहोत अशी वर्णवर्चस्वाची भूमिकाही एकंदर प्रतिपादनातून व्यक्त होते. असा एक अंतर्विरोध या कादंबऱ्यांत दिसून येतो. धर्मप्रसार आणि साम्राज्य-कर्त्यांची वर्चस्वाची भावना यांच्या एकत्रित जाणिवेतून चित्रणविषय हाताळल्यामुळे त्यात कृत्रिमता आली आहे. 'पुष्पकरंडक' मध्ये वर्चस्वाची भावना तुलनेने कमी आहे पण; धर्मप्रचाराकडे थेट रोख आहे. 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' मध्ये भोवतालच्या समाजाचे बारकाईने केलेले निरीक्षण आढळते. १९ व्या शतकाच्या पहिल्या ५० वर्षांत महाराष्ट्रात आलेल्या युरोपियन लोकांचा इथल्या जीवनाकडे बघण्याचा दृष्टिकोण काय होता त्याची झलक या कादंबऱ्यांत पहावयास मिळते.

'यात्रेकऱ्याचा वृत्तांत'मधील जग पुरुषांचे आहे. त्यात स्त्रियांना नगण्य स्थान आहे. राघोजीची बायको व मुलगी यांचे तसेच संताजीच्या मुलीचे उल्लेख दोन-तीनदा कथानकाच्या ओघात येतात तेवढेच. गुऱ्हाळाच्या ठिकाणी शाळेतल्या मुली येतात आणि गाणी म्हणतात, असा एक प्रसंग आहे. पण कादंबरीतील जीवनव्यवहारात स्त्रियांना मुळीच स्थान नाही. राघूची मुलगी शाळेत जायला लागते व तिला तेथे चिरडी मिळते. तिला मुळाक्षरे व थोडेथोडे शिवणकाम येऊ लागते असा उल्लेख आहे. मुलींना शिक्षण दिले पाहिजे, बालविवाहाला विरोध, पुनर्विवाहाचे समर्थन या ब्रिटिश सरकारच्या धोरणांचा पुरस्कार कादंबरीत आहे. त्यातून स्त्रियांबद्दलची सहानुभूती व्यक्त होते.

'फुलमुनी आणि करुणा' या कादंबरीतील निवेदन 'स्त्री' करते आणि स्त्रियांच्या जीवनचित्रणाला कादंबरीत महत्त्वाचे स्थान आहे. कादंबरीचा रोख धर्मप्रसाराकडे असल्यामुळे स्त्रिया 'व्यक्ती' म्हणून उभ्या रहात नसल्या तरी, स्त्रियांकडे 'कर्तेपण' दिले गेले आहे, हे महत्त्वाचे आहे.

एतद्देशीय शांता ही 'पुष्पकरंडक'ची नायिका आहे. ती सुशील, समंजस, हुशार व कष्टाळू आहे. कष्टकरी वर्गातील शांतेच्या मनावर तिच्या बापाने ख्रिश्चन धर्माचे संस्कार केले, त्यामुळे तिचे भले झाले असा कादंबरीचा सूर आहे. ही कादंबरी तत्कालीन वाचकांना प्रिय होती, हे तिच्या नंतर निघालेल्या आवृत्तीवरून आणि नियत-कालिकातील अभिप्रायांवरून लक्षात येते. त्यातील ख्रिश्चन धर्माच्या प्रचाराच्या अतिरिक्त भूमिकेसह स्वीकारण्याची वाचकांची तयारी होती, हे एका परीक्षणात स्पष्ट जाणवते.[१]

**आ) महाराष्ट्रीय स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्या :**

'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' १८३८ मध्ये प्रकाशित झाली. त्यानंतर एतद्देशीय लेखिकेची कादंबरी प्रकाशित होण्यास १८७३ साल उजाडावे लागले. साळूबाई तांबवेकर यांनी १८७३ मध्ये 'चंद्रप्रभाविरहवर्णन' ही कादंबरी लिहिली. कादंबरीच्या प्रस्तावनेत लेखिका लिहिते, .... वाचकहो, पुढे जे तुम्ही पुस्तक वाचणार आहात, त्यात स्त्रिया विद्वान असल्यापासून फायदे अविद्वान असल्यापासून हानी, पातिव्रत्त्य रक्षणापासून उत्तम सुखाची प्राप्ती, स्त्री-पुरुषांच्या खऱ्या प्रीतीचे स्वरूप, सत्कुलोत्पन्न मनुष्यावर किती दुःखे गुजरली तरी अंती ईश्वर धर्माने असल्यास त्यास सौख्यच देतो, चतुर व विद्वान स्त्री आपल्या चातुर्य-बलाने उभय कुलासही सुख देऊन उद्धार करते. इत्यादी प्रकारचे करवेल तितके चांगले स्पष्टीकरण केले आहे व पतिव्रता स्त्रियांस पतिविरहावाचून दुसरे प्रचंड दुःख नाहीच, म्हणून 'चंद्रप्रभाविरहवर्णन' असे नाव या पुस्तकास दिले आहे, (प्रस्तावना). थोडक्यात लेखिकेसमोरील वाचकवर्ग 'स्त्री' जातीचा आहे. सुखप्राप्तीसाठी काय करावे असा प्रश्न मनात ठेवून, आपल्या स्त्री-वाचकांसाठी जी कल्पित कथा तिने रचली आहे, त्यातून शिक्षण हे सुखप्राप्तीचे साधन आहे व पातिव्रत्त्य व धर्मानुसारी वर्तन अंतिमतः सुख देते असा बोध व्हावा, अशी तिची अपेक्षा आहे.

'चंद्रप्रभाविरहवर्णन' ही नायिका-प्रधान कादंबरी आहे. चंद्रप्रभा ही दक्षिण हिंदुस्थानातील मणिभद्रसेन छत्रपती महाराजांचे प्रधान रघुनाथराव दादासाहेब यांची सर्वात लहान कन्या असते. ती हुशार, चतुर असते.

अनुक्रमणिका

एके दिवशी एक फकीर राजकचेरीत येतो व सर्वांना उद्देशून प्रश्न करतो, 'मय कौन हैं? और मय आपके पास किस वास्ते आया हूँ? और मेरे हाथमें, ये पंजरा है उसमें ये दो पंछी, एक मैना और एक नुरी कौन है?' पुढे तो तीन दोहरे म्हणतो. राजाला कूट समजते पण; राज्यातील लोकांची हुशारी तपासावी म्हणून तो 'कचेरीतील लोकांपैकी कोणी ह्या प्रश्नांचे उत्तर देऊ शकेल काय?' असे विचारतो व प्रश्नाचे उत्तर मिळाले नाही तर; प्रधानाला फाशी देण्यात येईल असे जाहीर करतो. दादा-साहेब तीन दिवसांची मुदत मागून घेतात व घरी येतात; घरी गेल्यावर चंद्रप्रभा त्यांच्या म्लानपणाचे कारण विचारते. त्यांनी सांगितलेल्या कूटाचा विचार करते व जादूविद्येच्या साहाय्याने त्याचा अर्थ सांगते. राजसभेत रघुनाथराव उत्तरे देतात. मग राजा चंद्रप्रभेला कचेरीत बोलावून घेतो. व ती जादूविद्येच्या साहाय्याने पक्षांचे स्त्रियांत रूपांतर करते व फकीर हा एक आश्रयार्थ आलेला राजा असून दोन्ही पक्षी त्याच्या मुली आहेत, हे सिद्ध करते. राजा त्यांना आश्रय देतो.

ह्या कथाभागात चंद्रप्रभेच्या अंगच्या सामर्थ्याचे दर्शन घडते. ती हुशार आहे आणि तिच्याकडे अलौकिक सामर्थ्य आहे. चंद्रप्रभेच्या अंगी असलेल्या जादूविद्येचा पुढे कथानकात कुठेच संदर्भ नाही. हा कथाभाग न देता व चंद्रप्रभा हुशार, चतुर होती एवढे निवेदन करून पुढील कथानक मांडले असते तरी चालले असते, इतका हा भाग सुटा, अलग आहे. एकोणिसाव्या शतकात मौखिक परंपरा जगण्याचा एक भाग म्हणून अस्तित्वात होती. कूटकथा, चातुर्यकथा हा त्या परंपरेचाच एक भाग दीर्घ कथानके-आख्याने इ. मध्ये त्यांचे अस्तित्व हमखास असे. लिखित परंपरेतील कथात्मक वाङ्मय विशेषतः 'कादंबरी' या साहित्य प्रकाराची नीट ओळख नसल्यामुळे, नायक-नायिकांचा परिचय करून देण्याची मौखिक परंपरेतील रीत लेखिकेने अवलंबिलेली दिसते. चंद्रप्रभेच्या अंगच्या जादूविद्येकडे लौकिकार्थाने न पाहाता लक्ष्यार्थाने पाहिले तर काय जाणवेल? शिक्षणाची जादूची कांडी स्त्रियांना अद्‌भुत सामर्थ्य देईल, असा विश्वास लेखिका या प्रसंगाद्वारे व्यक्त करते. पिंजऱ्यातल्या पक्षांचे म्हणजेच परवश स्त्रियांचे व्यक्तीत, माणसात रूपांतर करण्याचे सामर्थ्य शिक्षणाने येते. असे सामर्थ्य चंद्रप्रभेत शिक्षणाने आले असल्याचा निर्वाळा लेखिका या प्रसंगाद्वारे देते.

अशा या चंद्रप्रभेला वडिलांनी सुचविलेले तरुण पसंत पडत नाहीत. मग ती आपल्याला आवडलेल्या कृष्णा नगरकरशी लग्न करण्याचा मनोदय वडिलांना पत्राद्वारे कळविते. यथावकाश तिचे त्याच्याशी लग्न होते. पुढे काही दिवसांनी आपल्या बहिणीसाठी वरसंशोधन करण्याच्या हेतूने कृष्णा घराबाहेर पडतो; तो चार वर्षे उलटली तरी परत येत नाही. चंद्रप्रभा विरहाने क्षीण होते. अखेरीस कृष्णा परत येतो पण थेट भेटण्यास येण्याऐवजी, चंद्रप्रभेची वृत्ती व चालचलणूक कशी आहे हे पाहाण्याकरिता गुप्त रीतीने सिद्धाचे सोंग घेऊन चौकशी करीत फिरतो. एकेदिवशी विरहव्यथेने चेहऱ्यावर पांडुरता आलेली चंद्रप्रभा नवऱ्याची वाट पाहात गच्चीवर उभी असते. कर्मधर्मसंयोगाने त्याचवेळी सिद्धवेषाने रस्त्यावरून जाणाऱ्या कृष्णाशी तिची दृष्टिभेट होते. ती मोहित होऊन मूर्च्छा येऊन पडते. शुद्धीवर आल्यावर दोघे एकमेकांना ओळखतात व आनंदाने भेटतात.

या कादंबरीत वेषांतरे, योगायोग यावर भर आहे. तपशिलवार वर्णने हे या कादंबरीचे आणखी एक वैशिष्ट्य. 'चतुरंग' नगराचे वर्णन जरी पाहिले तरी हे लक्षात येईल. बाजाराचे वर्णन करताना चोळयांचे काचोळया, कटोऱ्याच्या चोळया, हुक लावलेल्या चोळया, नऊ तुकड्यांच्या चोळया, मुंडेछाट चोळया, कमानीच्या चोळया, अखंड चोळया असे अनेक प्रकार येतात तर केवळ बांगड्यांचे ..... बिलोरी, सोनसळी, बारीक कारल्याच्या, वरली बिलोरी, छंद, लपेटे, जुळया गोखरू, नागमोडी बिलोरी, मिनाच्या बांगड्या कातीण बिलोर, हिरव्या, तांबड्या, काळया जाड बांगड्या असे अनेक प्रकार लेखिका वर्णिते. नगरातील पाणी-पुरवठ्याची व्यवस्था, रस्त्यावरील दिवे, बागबगीचे यांच्या वर्णनाबरोबरच प्रत्येक पेठेत मुलांच्या व मुलींच्या इंग्रजी व मराठी शाळा आणि तेथे शिकविल्या जाणाऱ्या भाषा यांचेही वर्णन येते. महाराजांचे पदरी कलावंतिणीचे ताफे व गाणाऱ्या वेश्या व गवई मिळून पाच हजार लोक असल्याचे लेखिका सांगते. असे एक संपन्न नगर अनेक प्रकारच्या बारीक-सारीक तपशिलांतून लेखिका उभे करते. अर्थात, या

वर्णनात अतिशयोक्ती मोठ्या प्रमाणावर आहे. तत्कालीन रुढींचे रीतीभातींचे वर्णनही काही प्रसंगांच्या (उदा. विवाह-सोहळा, फलशोभनाचा कार्यक्रम इ.) निमित्ताने येते. आख्यानातील कथनपद्धतीचा प्रभाव कादंबरीरचनेवर आहे. कादंबरीचे एकूण चार भाग आहेत. १) चतुरंग शहराचे वर्णन. २) चंद्रप्रभेने चातुर्याने पित्याचे प्राण वाचविणे. ३) विवाह ४) चंद्रप्रभेचा विरह व अखेरीस मिलन अशा चार भागात मिळून कथानकांची मांडणी केली आहे.

पारंपरिक जीवनसरणीत पातिव्रत्याला पवित्र मूल्याचे महत्त्व होते. या कादंबरीत या मूल्याला शिरोधार्य मानले आहे. शिक्षणामुळे हे मूल्य अधिक चांगल्या पद्धतीने अंगिकारता येईल; असा विश्वास लेखिका चंद्रप्रभेच्या जीवनचित्रणाधारे प्रकट करते. ही कादंबरी इ. स. १८७३ मध्ये लिहिली गेली. त्या वेळेपर्यंत सतीबंदीचा कायदा (इ. स. १८२७) होऊन ४५ वर्षे उलटून गेली होती. 'सती' प्रथेमागचे मुख्य मूल्य पातिव्रत्याचे. कोणतेही प्रश्न न विचारता, विरोध न करता पत्नीने पतीची सर्वप्रकारे सेवा केली पाहिजे, आज्ञा पाळली पाहिजे. तिची इतकी निष्ठा हवी की पतीच्या पश्चात तिने जिवंतही राहू नये; असा आशय या मूल्यात आहे. सतीबंदीच्या कायद्यामुळे आणि त्या काळातील सुधारक विचारवंतांच्या बोलण्या-लिहिण्यामुळे या मूल्याच्या श्रेष्ठत्वास तडे जाऊ लागले. नव्या विचाराचे वारे वाहू लागले. साळूबाई तांबवेकरांना मात्र पातिव्रत्त्य निःसंशयपणे मौल्यवान वाटते. त्याचबरोबर त्या शिक्षणाला महत्त्व देतात आणि अवतीभोवती होणारे बदलही टिपतात. उदाहरणार्थ, त्यांनी वर्णिलेल्या 'चतुरंग' नगरीच्या राजाला विद्याभ्यासाबद्दल तळमळ असल्यामुळे त्या नगरीत इंग्रजी, मराठी, गुजराथी, मारवाडी, तेलंगी, संस्कृत अशा भाषांच्या अध्यापनासाठी आणि फक्त मुलांसाठी नव्हे तर. मुलींसाठीही पंचवीस-तीस शाळा असतात. प्रत्येक भाषेसाठी स्वतंत्र शाळा असते. त्या व्यतिरिक्त गणित, भूगोल, खगोल, इतिहास, सिद्धान्त, संस्कृत, व्याकरण, न्याय, ज्योतिष, वेद, धर्मशास्त्र या विषयांच्या अभ्यासाचीही सोय असते. किंवा येथील न्याय व्यवस्थेचे वर्णन करताना मध्येच, 'विलायतेहून नवीन ॲक्ट छापून आले आहेत, बालिकांची कामे पुरुषास चांगली चालविता येत नाहीत. सबब ती उत्कृष्ट बोलक्या बायकांकडून चालवावी' असे निवेदन येते. (पृ. ५)

शिक्षणाचे महत्त्व पटले आहे, भोवताली चाललेल्या बदलाचे स्वागत करावे वाटते आहे पण; मध्ययुगीन मूल्ये सोडवत नाहीत अशी गोंधळाची मानसिकता त्या काळातील स्त्रियांची झाली असणार असा तर्क यातून निष्कर्षित होऊ शकतो.

"हिंदुस्थानचा तारा" ही साळूबाई तांबवेकरांची दुसरी कादंबरी इ.स. १८९४ साली प्रकाशित झाली. दुसऱ्या कादंबरीच्यावेळी लेखिकेचा आत्मविश्वास काहीसा वाढला आहे, याची प्रचिती दोन्ही कादंबऱ्यांच्या प्रस्तावना तुळून पाहिल्या तर सहज येते. 'चंद्रप्रभाविरहवर्णन' या कादंबरीच्या प्रारंभी 'पुस्तक करणारणीचा उद्देश' सांगितला आहे. त्यात लेखिका सांगते, '.... सांप्रतचे सुधारलेले विद्वतजन यांचे अभिरूचीस हे पुस्तक मुळीच येणार नाही.' याचे कारण उघड आहे. प्रथम एक तर ती स्त्री, दुसरे असे की, पुस्तक करण्यास जी सामग्री पाहिजे ती मुळीच मजजवळ नाही. (पृ. १) .... स्त्री शिक्षणात असलेल्या स्त्रियांचा व लहान मुलींचा काही वेळ करमणुकीत जाईल व सुबोधाने मनही रंजन होईल अशा प्रकारचे एक पुस्तक करून त्यांना यथाशक्ती सादर करावे असा हेतू मनात उत्पन्न झाला खरा परंतु हेतू, झाल्याबरोबर मोठमोठी पर्वतप्राय संकटे येऊन कंबरा बांधून मजपुढे उभी राहिली आणि मला म्हणाली की, 'तू यत्किंचित स्त्री जाती असून पुस्तक लिहिणार काय? तुझ्या पुस्तकास कोण बरे म्हणेल? .... तर मग हे पुस्तक तू स्वतः केले असे कोणी म्हणणार नाही. एखाद्या विद्वान गृहस्थाने करून ते निमित्याला पुढे झालीस असे आम्ही म्हणू' .... गुणज्ञहो, पुस्तककर्ती स्त्री जाती आहे म्हणून प्रथम वाचण्यापूर्वी या पुस्तकावर रागे भरू नका. (पृ. २,३) या प्रस्तावनेत लेखिकेच्या मनातील भीती, आशंका आणि आपण स्त्री असल्यामुळे लोक आपले लेखन स्वीकारणार नाहीत याचे दडपण स्पष्ट जाणवते. पहिल्या कादंबरीच्या वेळी तिच्यापुढे केवळ स्त्री-वाचकवर्ग होता. आता मात्र ती स्त्रिया व पुरुष अशा दोन्ही प्रकारच्या वाचक-वर्गासाठी लिहिते. ती म्हणते, '.... अशा पुस्तकापासून आमच्या देशभगिनींचा विशेष उपयोग व्हावा व देशबांधवांचे

मनोरंजन व्हावे या उमेदीने मी परिश्रम केले आहेत. तरी या पुस्तकास आश्रय देणे हे त्यांचे कर्तव्यच आहे. ते केल्यावाचून वाचक राहाणार नाहीत ही माझी विनंती आहे.' (प्रस्तावना)

'हिंदुस्थानचा तारा' ही राजस्त्री व कमला अशा दोन स्त्रियांची जीवनकहाणी आहे. कादंबरीचे एकंदर नऊ भाग आहेत. तीत, अनेक उपकथानके, सलगतेचा अभाव, पात्रांना नावे न देता 'ती स्त्री' यासारखे उल्लेख केल्यामुळे वाढलेली क्लिष्टता अशी काही ठळक वैशिष्ट्ये आढळतात. कादंबरीचे कथानक पुढीलप्रमाणे आहे.

वादळात जहाज फुटल्यामुळे एका स्त्रीची आपल्या कुटुंबियांशी ताटातूट होते पण; दैवयोगाने एका फळीच्या आधाराने ती कुठल्याशा खडकाला लागते. तिथे जीव देण्याच्या हेतूने आलेल्या कमलेची व तिची भेट होते. कमला ही कर्नाटकातील इवली धनशेट नावाच्या सावकाराची मुलगी असते. तिने एका सावकारपुत्राला मनाने वरलेले असते पण तिचे वडील तिचा विवाह दुसऱ्याच एका सावकार पुत्राबरोबर ठरवितात. म्हणून ती घराबाहेर पडलेली असते आणि जिवाचे बरे-वाईट करण्याच्या विचारात असते. पण इतक्यात तिला ती वादळात सापडलेली स्त्री भेटते, त्यामुळे तिचे मन स्थिर होते व जगण्याची पुन्हा आशा तिच्या मनात निर्माण होते. पाच दिवसानंतर योगायोगाने एक जहाज येते व त्या जहाजावरील कोणी सावकारपुत्र त्या दोघींना बहिणी मानून आपल्या घरी घेऊन जातो. त्याची पत्नी सुस्वभावी असते. ती त्यांना चांगली वागणूक देते. त्या दोघा शेजार-पाजारच्या मुलामुलींना एकत्र करून विद्याकलादिकांचे शिक्षण देण्याचे काम आपणहून पत्करतात. या त्यांच्या कामाबद्दल लोक त्यांची प्रशंसा करतात. त्या दोघींपैकी जी वादळात सापडलेली असते, ती चंद्रपूरचा राजा मकरध्वज याची धाकटी सून गर्भवती असते. यथावकाश ती प्रसूत होऊन, तिला मुलगा होतो. त्याच्या बारशाच्या दिवशी काही स्वार व कारकून चौकशीसाठी त्या शहरात येतात. त्यांना राजस्त्रीचा पत्ता लागतो. ते लोक ही बातमी राजाला कळवितात. पत्नीच्या विरहाने व्याकूळ झालेला राजपुत्र येऊन आपल्या पत्नीला घेऊन जातो. कमलावती मात्र त्याच शहरात राहून मुलामुलींना शिकविण्याचे काम करण्याचे ठरविते. पहिल्या व चौथ्या भागात हे कथानक येते.

अन्य भागात सावकारपुत्राची कथा आहे. हा सावकारपुत्र म्हणजेच कमलिनीचा प्रियकर होय. हा सावकारपुत्र चतुर व साहसी असतो. एक फकीर त्याला जादूच्या पादुका देतो. दंडात ताईत बांधतो व काही वनस्पती आणून देतो. या सर्व गोष्टींच्या साह्याने सावकारपुत्र पाषाणमय पाताळभवनातील चारी राजकन्यांची सुटका करतो. त्यांपैकी तिघी पाताळभवनातील आपल्याला आवडलेल्या पुरुषांशी लग्न करतात. यथावकाश चौथ्या राज्यकन्येलाही अनुरूप वर मिळतो. या सर्वांना घेऊन, योगायोगाने भेटलेल्या कमलिनीसमवेत तो सावकारपुत्र राजाकडे जातो. व आपण आपले कर्तव्य पार पाडल्याचे सांगतो.

राजस्त्री व कमलिनी यांच्या जीवनकथेला अन्य अनेक उपकथानके जोडलेली आहेत. राक्षस, पिशाच्च, साई, फकीर, महंत, तपस्वी, जादूची मुळी, जादूचे पक्षी, जादूच्या पादुका अनेक योगायोग यांनी भरलेले हे अद्‌भुतरम्य कथानक आहे.

१९ व्या शतकात, कादंबरीच्या प्रारंभकाळी अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांचा एक प्रवाह दिसतो. भालचंद्र नेमाडे यांनी या प्रवाहाला, ल. मो. हळबे यांच्या 'मुक्तमाला' कादंबरीच्या प्रवाहातील कादंबऱ्या या अर्थाने, मुक्तामालाप्रवृत्ती असे नाव दिले आहे.[१०] या मुक्तामालाप्रवृत्तीतील कादंबऱ्यांहून 'हिंदुस्थानचा तारा' चे वेगळेपण उठून दिसणारे आहे. 'मुक्तमाला' च्या परंपरेतील कादंबऱ्यांतील स्त्रिया निव्वळ 'संरक्षणीय' म्हणून येतात. त्या कोणाचे तरी 'प्राप्य' असतात. त्यांच्यावर अनेक संकटे कोसळतात आणि कादंबऱ्यांचे नायक त्यांची संकटातून सुटका करतात. 'हिंदुस्थानचा तारा' मधील नायिका कृतिशील आहेत. प्रसंगातून बाहेर पडण्यासाठी त्या धडपडतात आणि आपत्कालातही खचून न जाता भोवतालच्या कुटुंबातील मुला-मुलींना विद्या-कलादिक शिकवितात. राजस्त्रीला तिचे कुटुंब भेटल्यावर ती कमलिनीला आपल्याबरोबर येण्याचा आग्रह करते पण; तिला नकार देऊन कमलिनी

तेथेच शिकविण्याचे काम करीत स्वतंत्रपणे राहाते. (पृ.४५) स्त्रियांची ही कृतिशीलता हे या कादंबरीचे वेगळेपण आहे. अर्थात् कमलिनीचे कथानक वास्तववादी पद्धतीने विकसित करण्याचे न जमल्यामुळे पुढची सावकारपुत्राची सर्व कथा लहानमुलांच्या कथांसारखी केवळ असंभवनीय अद्‌भुताच्या वाटेने गेली आहे. हे लेखिकेचे मोठे अपयश आहे.

साळुबाई तांबवेकरांच्या दोन्ही कादंबऱ्यांचा एकत्रितपणे विचार केला तर जाणवणारी प्रमुख गोष्ट म्हणजे पातिव्रत्याचे माहात्म्य आणि शिक्षणाचे महत्त्व; या दोन्हीचे केलेले चित्रण. 'चंद्रप्रभाविरहवर्णन' मध्ये याचे चित्रण कसे केले आहे, ते आपण पाहिलेच आहे. 'हिंदुस्थानचा तारा' मध्येही घटना-प्रसंगांतून आणि शाब्दिक पातळीवरूनही या दोन्हीचे श्रेष्ठत्व वर्णिले आहे. त्यातील स्त्रियांच्या पातिव्रत्यामुळे वाईट प्रवृत्तीची माणसे त्यांच्या वाट्याला जात नाहीत, एवढेच नव्हे तर; वाघ, सर्प इत्यादी सुद्धा त्यांना कोणतीही इजा करीत नाहीत.

या दोन्ही कादंबऱ्यांमध्ये सामाजिकसत्तासंबंधांना संरक्षण देणाऱ्या विचारप्रणाली आणि मूल्ये त्यांना मुळीच विरोध केलेला नाही. साळुबाई तांबवेकर पुण्यासारख्या शहरात राहात होत्या. सत्यशोधक समाजाची चळवळ, प्रार्थना समाजाची चळवळ, विधवाविवाहोत्तेजक चळवळ, सुधारक व सनातन्यांमधील वाद, ग्रामण्यप्रकरणे यांनी पुणे शहर ढवळून निघाले होते; साळुबाई तांबवेकर मात्र आपल्या कादंबऱ्यांमधून पुरुषसत्ताक व्यवस्थेचे प्रारूपच मांडतात. सुधारकांचे प्रयत्न किती मर्यादित वर्तुळात पोहोचले होते, याचे हे एक उदाहरण म्हणता येईल. शिक्षणाचा उपयोगसुद्धा पातिव्रत्याचे संरक्षण हा आहे असे साळुबाई प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्षरीतीने व्यक्त करतात. आपल्या नायिकांना पुरुषी-क्षमता बहाल करतात.

पुरुषप्रधान विचारप्रणाली व त्यावर आधारित सामाजिक संस्था हे पुरुषसत्ताक समाजातील स्त्रियांच्या दमनाचे केंद्र बनत असते. १९ व्या शतकातील भारतीय समाजाच्या बाबतीत ही बाब अधिकच खरी होती. तो एक सामाजिक व्यूहच होता. स्त्रिया कादंबरीलेखन करीत असताना या व्यूहाला कशा सामोऱ्या जात होत्या हे पाहण्यासारखे आहे. साळुबाई तांबवेकरांनी पातिव्रत्य या मूल्याचा पुरस्कार केला हे आपण नुकतेच पाहिले. परंतु, हेही लक्षात घेतले पाहिजे की, वेषांतरे, योगायोग, जादूचे प्रकार, अद्‌भुतता यांचा सढळ वापर त्यांच्या कादंबऱ्यांत असला तरी त्या कादंबऱ्या व्यक्तिस्वातंत्र्य, शिक्षण या आधुनिक मूल्यांचा तसेच पारंपारिक जीवनशैलीपेक्षा वेगळ्या जीवनशैलीचा पुरस्कार करतात. उदाहरणार्थ 'चंद्रप्रभाविरहवर्णन'ची नायिका वडिलांनी ठरविलेल्या लग्नाला मान्यता देत नाही तर; आपल्याला आवडलेल्या तरुणाशी लग्न करण्याचा मनोदय वडिलांना पत्राद्वारे कळविते.

पुढे लग्नानंतर काही काळाने तिचा नवरा आपल्या बहिणीसाठी स्थळ शोधण्याच्या हेतूने प्रवासास बाहेर पडतो. पुष्कळ काळ लोटला तरी; तो परत येत नाही. चंद्रप्रभा विरहाने व्याकूळ होऊन नवऱ्याची वाट पाहात गच्चीत उभी राहते. त्याप्रसंगी तिच्या मैत्रिणी तिची थट्टामस्करी करीतात.

कादंबरीतील हा प्रसंग १९ व्या शतकातील सामाजिक जीवनशैलीमध्ये बसण्यासारखा नाही. 'श्रीमती काशीबाई कानिटकर आत्मचरित्र आणि चरित्र' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत (रूमाल उलगडण्यापूर्वी)[११] सरोजिनी वैद्यांनी आपल्या वडिलांनी सांगितलेली एक आठवण दिली आहे. 'संध्याकाळी रावसाहेब कोर्टातून परत आले म्हणजे रावसाहेब आणि काशीबाई चहा घेण्यासाठी पुढच्या दिवाणखान्याच्या माडीत, समोरासमोर येऊन बसत, क्वचित् कधी सकाळी-संध्याकाळी ते दोघे नीरा नदीच्या बाजूला फिरायलाही बरोबर जात. त्या वेळी गावातील लोकांना त्यांचे ते चहा घेणे, फिरायला जाणे हा चर्चेचाच विषय असे. ते दोघे दिवाणखान्यात असले म्हणजे वाड्यातील इतर मंडळींना त्यांच्या समोरून ओसरीवरून बाहेरच्या दरवाज्याकडं सुद्धा फार अवघडून यावं-जावं लागायचं. काशीबाई कानिटकरांनी डहाणू गावात गेल्यानंतर आलेल्या अनुभवाबद्दल सांगितले आहे, 'पहिल्याच दिवशी दोन मुले आणि हे दोघे पती-पत्नी समुद्रावर फिरावयास जाण्यास निघाले. काशीबाईच्या पायात जोडा होता व अंगावर शाल होती. वाटतेत एक लग्नाचा मंडप लागला. हे चौघे बरोबर जाताना पाहून; जेवणारी शंभर-दीडशे माणसे खरकटे हात पाठीमागे वळवून त्यांना पाहाण्यासाठी

बाहेर येऊन उभी राहिली."[१२] अशी एकंदरीत सामाजिक परिस्थिती होती. वडिलधाऱ्या मंडळीच्या समोर नवऱ्याशी बोलणे, किंवा त्यांच्याबद्दल बोलणे निर्लज्जपणाचे मानले जाई. असे असूनही साळुबाई तांबवेकरांनी नवऱ्याची वाट पाहात उभी असणारी नायिका निर्माण केली. तत्कालीन कुटुंबसंस्थेच्या जाचणूकीविरुद्ध आवाज उठवून संघर्ष करणे शक्य नव्हते. त्यामुळे लेखिकेने हा कल्पिताचा मार्ग अवलंबिलेला दिसतो.

शिक्षणाच्या बाबतीतही असेच घडलेले दिसते. ज्या काळामध्ये 'स्त्री जेवढे शिकेल तेवढ्या प्रमाणात तिच्या नवऱ्याचे आयुष्य कमी होते. अशी सार्वत्रिक समजूत होती."[१३] त्या काळात 'हिंदुस्थानचा तारा' मधील स्त्री एकटी राहाते एवढेच नव्हे तर आजूबाजूच्या मुलांना एकत्र करून त्यांच्यासाठी शाळा चालविते (पृ. ३७)

वेषांतर, योगायोग, अद्भुतरम्यता हे सगळेच साळुबाई तांबेवकरांच्या दोन्ही कादंबऱ्यांत भरपूर प्रमाणात आहे. रचनेच्या दृष्टीनेही शिथिलपणा, विस्कळितपणा अस दोष आहेत. हे सर्व जमेस धरूनही असा अभिप्राय व्यक्त करावासा वाटतो की, सामाजिक प्रतिष्ठेच्या बाबतीत हीन गणल्या गेलेल्या साळुबाईंनी कादंबऱ्या लिहिल्या हेच एक मोठे साहस आहे. त्याशिवाय त्यांनी आपला जोडीदार निवडण्याचे स्वातंत्र्य घेण्याची, एकटीने जगण्याची तसेच अर्थार्जन करून स्वावलंबी बनण्याची आधुनिक जीवनशैलीही नायिकांच्या कृतीमधून चित्रित केली; हे खरोखर महत्त्वाचे आहे.

इ. स. १८९० मध्ये लिहिलेली 'प्रीतीचा मोबदला अथवा पुष्पगुच्छ आणि वनमाला' ही कादंबरी गोदावरीबाई पंडित यांनी 'स्त्री शिक्षणाचा विजय इच्छिणाऱ्या व नाटक – कादंबरी अशा पुस्तकांचे बरे रहस्य जाणणाऱ्या स्वदेश बांधव व भगिनींना अर्पण केली आहे' प्रस्तावनेमध्ये त्या प्रमाणात की, विविधप्रकारच्या विषयांवरील पुस्तकांची समृद्धी होणे हे देशाचे भावी सुचिन्हच असते. मनोरंजनपर पुस्तकांतून नीती, ज्ञान, बोध आणि सत्यता अशा महत्त्वाच्या विषयांचे बीजारोपण होते. कल्पित कादंबऱ्या आणि नाटके यांना हे विशेषत्वाने लागू पडते.[१४] गोदावरी पंडितांची ही कादंबरी सुरस आणि उत्कंठावर्धक आहे.

कादंबरीच्या प्रारंभी राज्यात मोठे बंड होते. या बंडात सुमारे दहा हजार लोक सामील असतात. राजाने प्रजेवर जाचक कर बसविलेले असतात; त्यामुळे प्रजा चिडून बंड करते. या बंडात राजा मृत्युमुखी पडतो. वडिलांशी पटत नसल्यामुळे राजधानीपासून दूर राहणारा राजकुमार विद्याधर लगेच धावून येतो. तो बंडवाल्यांचा शोध घेऊ लागतो. त्या वेळी कोणीही कोणाचे नाव सांगावे, त्याला बंदिवासात अडकवावे आणि आपले वैर साधावे, असा अनागोंदी प्रकार सुरू असतो. त्यात अनेक निरपराध लोकही तुरुंगात डांबले जातात. अशा पैकीच एक प्रकार घडून, सरदारपुत्र पुष्पगुच्छही पकडला जातो. त्याची संपत्ती हडप करण्यासाठी त्याचे भाऊबंद कट करून त्याला पद्धतशीरपणे अडकवितात त्याला देहदंडाची शिक्षा सुनावली जाते.

सरदारपुत्र पुष्पगुच्छाला तोफेच्या तोंडी बांधले जाते. तेवढ्यात पुष्पगुच्छाची प्रेयसी वनमाला तेथे जाते व पुष्पगुच्छ निर्दोष असून खऱ्या बंडवाल्यांना आपण स्वतः कोंडून ठेवले आहे; असे सांगते. तिच्यावर विश्वास ठेवून सर्वजण शेतकऱ्याच्या वाड्यात जातात. तेथील त्या बंडखोरांना ताब्यात घेतात. राजपुत्र विद्यासागर पुष्पगुच्छाची सुटका करतो व स्वतः सत्तारुढ होतो. एका शेतकऱ्यांच्या मुलीचे–वनमालेचे धाडस पाहून तो तिच्या प्रेमात पडतो. व आपले प्रेम तिच्याजवळ व्यक्त करतो. ती आपले पुष्पगुच्छावर प्रेम असल्याचे सांगते. हे ऐकून राजपुत्राला राग येतो व तो तिला तुरुंगात टाकतो. वनमाला अचानक नाहीशी झाल्याचे पाहून पुष्पगुच्छ तिचा शोध घेत सर्वत्र फिरतो. वनमाला कोठडीतून युक्तीने एका म्हाताऱ्या गृहस्थाकरवी पुष्पगुच्छाला पत्र देऊन आपली माहिती कळविते. वनमालेला सोडविण्यासाठी पुष्पगुच्छ वेषांतर करून राजवाड्यावर जातो. त्याच वेळी तिथे राजपुत्राविरुद्ध कटकारस्थान चाललेले असते. त्या संधीचा फायदा घेऊन पुष्पगुच्छ वनमालेची सुटका करतो आणि तिला तिच्या आजीकडे पाठवून देतो. राजपुत्र त्या दोघांनाही शोधून काढतो आणि कैदेत टाकतो. तो वनमालेला चार प्रश्न विचारतो त्या प्रश्नांची योग्य उत्तरे वनमाला देते. त्याला समजावते व 'प्रीतीचा मोबदला प्रीतीच आहे, जबरदस्तीने प्रीती मिळत नाही' हे पटवून देते. राजपुत्राला पश्चात्ताप होतो. तो तिची

क्षमा मागतो. तिला आपली बहीण मानून नीतीने राज्य-कारभार करण्याची प्रतिज्ञा करतो व पुष्पगुच्छास आपला प्रधान म्हणून नेमतो.

कादंबरीच्या शेवटी लेखिका भरतवाक्य लिहिते 'हा सर्व परिणाम स्त्री शिक्षणाचा होय. यावरून प्रपंचात सुशिक्षित स्त्रियांची मातबरी किती आहे, हे आमच्या सूज्ञ वाचकांच्या सहज लक्षात येण्यासारखे आहे. म्हणून, सुखेच्छू आर्य बांधवहो, तुम्हास जर संसारात सुखाची इच्छा असेल तर स्त्रियांस सुशिक्षण देऊन त्यास ज्ञानप्राप्ती करून देण्याविषयी आळस करू नका?' ही कादंबरी लिहिण्यामागचा लेखिकेचा हेतू स्त्री-शिक्षणाबद्दल अनुकूल भाग निर्माण करणे हा असला पाहिजे. कादंबरीच्या अर्पणपत्रिकेतूनही तो व्यक्त होतो. शिक्षण आणि सुख यांचे समीकरण कथानकाच्या माध्यमातून मांडले जाते.

गोदावरी पंडितांचा वाचनाचा व्यासंग होता. त्यांच्या 'नीतिदर्पण अथवा सद्‌गुणशतावली' या पुस्तकांमध्ये न्यायावलंबन, प्रामाणिकपणा, भूतदया, सत्य, परोपकार या गुणांचे सोदाहरण विवेचन आहे. पारंपरिक विचार-पद्धतीपेक्षा गोदावरीबाईंची विचार करण्याची रीत कशी वेगळी होती. हे त्यांनी परोपकार या सद्‌गुणाबद्दल केलेल्या विवेचनावरून ध्यानात येते. 'परोपकार या सद्‌गुणाबद्दल त्यांनी सांगितलेली गोष्ट ही एका सुशील विधवेची आहे.' या विधवेजवळ पुष्कळ द्रव्य होते. या द्रव्याचे काय करावे याबद्दल पुष्कळ लोकांनी तिला सल्ला दिला. या सर्वांमध्ये एका विधवा बाईसच त्यांनी सल्ला विचारला असता त्या बाई म्हणाल्या, "मजबरोबर तू पंढपूरास चल. तेथे आपण सर्व विधवा बाया एकत्र जमवून विधवांचे एक प्रदर्शन करू. यामुळे जन्म-जन्मांतरीच्या ठिकाणी तू आणि मी सारख्याच स्वतंत्र विधवा होऊन पोळपाटलाटण्यांचा सुकाल करून सोडू हा महल्लाभ आपणास प्राप्त होईल!"[१५] मूल्यांकडे व सामाजिक परिस्थितीकडे पाहाण्याचा अशाच प्रकारचा आधुनिक दृष्टिकोण 'प्रीतीचा मोबदला अथवा पुष्पगुच्छ आणि वनमाला' या कादंबरीत दिसून येतो. कादंबरीच्या अगदी सुरवातीलाच लेखिका युद्धाच्या गोष्टी रम्य असतात; ह्या आशयाच्या लोकांच्या समजुतीवर भाष्य करते आणि म्हणते की, अर्थशास्त्राच्या निर्णयावरून हा लोकापवाद केवळ शुष्क आणि एकदेशीय आहे. कारण शांततेपेक्षा धामधुमीची किंमत पुष्कळपटीने अधिक असते. जगातल्या सर्व महत्त्वाच्या राजकीय उलाढालींना धामधुमीचे व बळाचे पाठबळ असलेले दिसते. बंडाकडे बघण्याचा हा आधुनिक दृष्टिकोण लेखिका कादंबरीच्या अगदी प्रारंभीच प्रकट करते. ज्या काळामध्ये बालविवाह, सतीप्रथा, पुनर्विवाहास बंदी, चूलमूल व्यतिरिक्त सामाजिक व्यव-हारात सहभागी होण्यास अटकाव यासारख्या अनेक जाचक रुढी परंपरांनी मराठी स्त्रियांचे शोषण होत होते; त्या काळात गोदावरीबाईंनी, आई वडिलांच्या मृत्यूनंतर एकटी राहणारी; आपल्या बुद्धिचातुर्याने चार शस्त्रधारी बंडखोरांना पकडून देणारी; आणि हरप्रकारे प्रयत्न करून आपल्या आवडीचा जोडीदार मिळविणारी नायिका चित्रित केली. प्रीती हे आधुनिक मूल्य आहे. राजाच्या सत्ता-सामर्थ्यालाही बळी न पडता ही नायिका प्रीती संपादन करते. कादंबरीच्या कथावकाशात तिच्यावर एकंदर तीन वेळेला बलात्काराचा प्रसंग येतो. पहिल्या प्रसंगातून ती चातुर्याने बाहेर पडते तर; दुसऱ्या दोन प्रसंगांतून योगायोगाने व काही आकस्मिक घटना घडून तिची सुटका होते. या साऱ्याच प्रसंगात गोदावरीबाईंनी समस्येची अगदी सोपे-पणाने सोडवणूक केली आहे. हे खरे असले तरी; अशा विपरित प्रसंगांना तोंड देणारी नायिका त्यांनी कल्पिली हे महत्त्वाचे आहे. योगायोग, वेषांतर, काळा पोशाख घालून संकटातून सुटका करणारा धाडसी नायक, कूटप्रश्न अशा अनेक क्लुप्त्यामुळे कादंबरीचे कथानक उत्कंठावर्धक झाले आहे. 'वनमाला आणि पुष्पगुच्छ' यांना अंतिमतः सुख मिळाल्याचे चित्रित करून लेखिका म्हणते की, त्यांच्याप्रमाणेच तुम्हाला सुखाची इच्छा असेल तर; स्त्रियांना शिक्षण देण्यात आळस करू नका. शिक्षण सुखाची गुरुकिल्ली आहे ही प्रबळ भावना इथे प्रकट होते.

वर विवेचिलेल्या कादंबऱ्यांच्या पार्श्वभूमीवर श्रीमती काशीबाई कानिटकारांच्या 'रंगराव' आणि 'पालखीचा गोंडा' या कादंबऱ्या आपल्या गुणवत्तेने उठून दिसतात. या दोन्ही कादंबऱ्यांची निर्मिती एकोणिसाव्या शतकात झाली खरी परंतु; पुस्तकरूपाने प्रकाशित होण्यासाठी त्यांना पुष्कळ वाट पहावी लागली. रंगराव १९०३ मध्ये तर पालखीचा गोंडा १९२८ मध्ये पुस्तकरूपाने प्रकाशित

झाली.

१९ व्या शतकात महाराष्ट्रातील अगदी बोटावर मोजता येतील अशा सुशिक्षित व सामाजिक कार्य करणाऱ्या स्त्रियांपैकी काशीबाई कानिटकर या एक होत्या. लग्नापूर्वी त्यांचे जुजबी शिक्षण झाले होते; परंतु लग्नानंतर गोविंदराव कानिटकरांनी स्वतः त्यांना शिकविले. गोविंदराव कवी, लेखक होते. त्यांचे विविध विषयांवर चौफेर वाचन होते. आधुनिक विचारसरणीचा त्यांनी जाणीवपूर्वक स्वीकार केला होता. काशीबाईंना त्यांनी Subjection of women हे पुस्तक शिकविले, या घटनेतून त्यांची विचार करण्याची पद्धत सहज ध्यानात येते. हरीभाऊ आपटे यांचे कानिटकर कुटुंबाशी जिव्हाळ्याचे संबंध होते. पंडिता रमाबाई, रमाबाई रानडे यांच्याबरोबर काशीबाईचे स्नेहसंबंध होते. आर्य महिला समाजाच्या सभेत या दोघींप्रमाणेच त्याही व्याख्याने देत असत. सन १८८९ मध्ये झालेल्या दुसऱ्या काँग्रेसच्या त्या सभासद होत्या.[१६] १८९० साली झालेल्या सामाजिक परिषदेच्या सभेत मांडलेल्या "बारा वर्षांच्या आतील वयाच्या पत्नीशी गमन करणारा जबरी संभोगाचा गुन्हा करील असे कायद्याने ठरवावे" या बिलाचे त्यांनी समर्थन केले होते.[१७]

काशीबाईंनी विविध प्रकारचे लेखन केले. वर उल्लेखिलेल्या दोन कादंबऱ्या, डॉ. आनंदीबाई जोशी यांचे चरित्र, चांदण्यातील गप्पा (१९२१) हा कथासंग्रह, शिळोप्याच्या गोष्टी (मासिक मनोरंजन १९२८-२९) असे त्यांचे स्वतंत्र लेखन प्रसिद्ध आहे, तर; भारत महिला परिषदेचा पहिला अहवाल (१९०६), हरिभाऊंची पत्रे (१९२९) अशी संपादने आहेत. याशिवाय, जे कृष्णमूर्ती यांच्या At the feet of the Master या पुस्तकाचे भाषांतर व स्फुट लेख, परीक्षणे अशी यांची साहित्यसंपदा आहे.

इंग्रजी वाङ्मयाचे वाचन, आधुनिक विचारसरणी, प्रगल्भ सामाजिक दृष्टिकोण आणि प्रत्यक्ष सामाजिक कार्यात सहभाग या त्यांच्या जीवनवैशिष्ट्यांचे प्रतिबिंब त्यांच कादंबऱ्यांतही दिसते. त्यामुळे त्या अन्य लेखिकांच्याच नव्हे तर; त्या काळातील पुरुष कादंबरीकारांच्या कादंबऱ्यांतही वेगळेपणाने उठून दिसतात.

'रंगराव' ही त्यांची पहिली कादंबरी. सन १८८५ मध्ये ती त्यांनी लिहायला सुरुवात केली. 'मनोरंजन' व 'निबंधचंद्रिका' मधून तिची काही प्रकरणे क्रमशः प्रकाशित झाली आणि पुढे ती १९०३ मध्ये पुस्तक रूपाने प्रकाशित झाली. कादंबरीचा नायक रंगराव हा श्रीनगराचे इनामदार यादवराव आपटे यांचा मुलगा. त्यांना एकंदर सहा मुले असतात. पैकी एका मुलाचे व दोन मुलींची लग्ने झालेली असतात. रंगराव व त्याचा भाऊ व्यंकट हे दोघे पुण्याला फर्ग्युसनमध्ये शिक्षण घेण्यासाठी जातात. रंगरावाला लहानपणापासून तलवार, दांडपट्टा, लढाई यांचे आकर्षण असते. त्या आकर्षणामुळे आपले शिक्षण मध्येच थांबवून तो सैन्यात भरती होतो. सैन्याबरोबर परदेशी गेल्यावर तिथले लोक, जीवन पाहिल्यामुळे तसेच, ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या सहवासात राहून त्याचे विचार अधिक पक्व होतात. आपल्या लहान भावाला, व्यंकटलाही तो बॅरिस्टर होण्यासाठी आपल्याकडे बोलावून घेतो. काही काळानंतर ते दोघे मायदेशी परत येतात.

इकडे रंगरावाचा मित्र प्रभाकरपंत स्त्रीशिक्षणाच्या बाजूचा असल्याने व आपले विचार कृतीत उतरविण्याच्या स्वभावाचा असल्यामुळे त्याने आपल्या दोघी बहिणींना शिक्षण घेण्यास प्रोत्साहन दिलेले असते. जाणीवपूर्वक आणि लोकांच्या टीकेला न जुमानता त्यांच्या विवाहाची गोष्ट त्याने लांबणीवर टाकलेली असते. रंगराव आणि व्यंकटराव यांच्याबरोबर अनुक्रमे आपल्या दोघी बहिणींची लग्ने व्हावी असे त्याला वाटत असते. त्या दोघांनाही या शिकलेल्या, स्वतंत्र विचाराच्या मुली आवडतात व त्यांची लग्ने होतात. धाकटा भाऊ श्रीपतीचेही लग्न होते. रंगराव आपल्या भावजयांना टेनिस खेळायला शिकवितो. थोडे दिवस गावात राहून सर्वजण आपापल्या नोकरीच्या ठिकाणी निघून जातात, असे रंगरावचे कथानक आहे.

एकत्र कुटुंबातील वातावरणाचे वास्तव चित्रण, वेगवेगळ्या प्रकारच्या स्वभावाच्या व्यक्तींची बोलकी चित्रे सामाजिक जीवनाबद्दलच्या, विवाहपद्धतीबद्दलच्या पात्रातून आणि प्रत्यक्षपणे केलेल्या चर्चा आणि बालविवाह, वैधव्य इ. अनिष्टांमुळे स्त्रियांच्या कुचंबलेल्या जीवनाचे चित्रण ही या कादंबरीची वैशिष्ट्ये आहेत. सहज, अकृत्रिम भाषा आणि ओघवते कथानक यामुळे कादंबरी वाचकाच्या पसंतीस उतरते. एका प्रौढ, प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचा अंतः-

अनुक्रमणिका

स्वर साऱ्या कादंबरीतून जाणवत राहातो.

गोविंदरावांबरोबरचे सहजीवन, चर्चा, उत्तम प्रकारच्या निवडक ग्रंथांचे वाचन, हरिभाऊ आपट्यांचा स्नेह, प्रार्थना समाज व आर्य महिला समाज या तत्कालीन प्रागतिक विचारांच्या, आधुनिक आणि प्रगल्भ सामाजिक दृष्टी असलेल्या चळवळींमध्ये प्रत्यक्ष सहभाग या प्रकारच्या जीवनशैलीमुळे काशीबाईंची जीवनाकडे व सभोवतालच्या परिस्थितीकडे पहाण्याची स्वतःची अशी दृष्टी तयार झाली होती. विवाह, स्त्रियांचे शिक्षण हे त्या काळातील सुशिक्षितांमध्ये बहुर्चचित विषय होते. या चर्चा आणि सुशिक्षित तरुणांचे संसार काशीताईंनी पाहिले होते. त्याचे प्रतिबिंब 'रंगराव' मधील चर्चांत आणि व्यक्त झालेल्या विचारांत पहावयास मिळते. उदाहरणार्थ, रंगरावच्या वडिलांना त्याचे आता लग्न करावे असे वाटते असते म्हणून त्याने तूर्त परदेशी जाऊ नये असा निरोप ते पत्राद्वारे त्याला कळवितात तेव्हा रंगराव आपल्या भावाला उत्तरादाखल लिहितो, '... लोक हसतात व मोठ्यांच्या मुली सांगून येतात, एवढ्या कारणाने लग्न करणे मला बरे दिसत नाही. लग्न म्हणजे काही हंगामात माल चांगला व स्वस्त मिळतो म्हणून त्याची बेगमी करावयाची नाही किंवा एखादा उमदा खुपसूरत विकायला आलेला अरब होणे किंवा आडगिराईकी परंतु उत्तम ब्रिच लोडर होणे नव्हे. ....जेन आस्टेनच्या प्राइड आणि प्रेजुडीस या कादंबरीतील डारसीचे लग्न झाले होते, व ते लग्नच सर्वात उत्तम अशी माझी समजूत आहे. .. इकडच्या लग्नाची उत्तम कल्पना म्हटली म्हणजे, पुष्कळ संपत्ती, बायको रूपाने चांगली आणि नवऱ्याच्यापुढे अगदी दासानुदास, पुष्कळशी मुले इतके अनुकूल असले म्हणजे झाले. मग सुखाला पारावर नाही. मग यात या बायकोचा स्वभाव कसा आहे, आणि नवऱ्याचा कसा आहे, याची कल्पना कोणालाही नाही. .... तिऱ्हाइताने लग्न जमवून आम्ही ऐत्या वेळी माळ घालण्यास तेथे जावे, हे मला आवडत नाही. व श्रीमंतांच्या मुली आल्या म्हणून लग्न करावयाचे हेही आवडत नाही. किंवा आठ-दहा वर्षांच्या गोजिरवाण्या मुलींशीही लग्न करणे आवडत नाही.' (पृ. १७९ ते १८३)

दुसऱ्या एका प्रसंगी 'शिकलेली स्त्री म्हणजे काय' या विषयावर चाललेल्या चर्चेत अंबू म्हणते, '... लिहिता आलं तर शिकलेली स्त्री म्हणायची की वाचता आलं तर, की कशिदा शिवणं बिवणं हे सारं आलं म्हणजे शिकलेली म्हणायची, की कसं हे अगोदर समजलं पाहिजे त्यावर प्रभाकर पुढीलप्रमाणे उत्तर देतो,' '... शिकलेला याचा अर्थ नुसते वाचायला लिहायला येणे एवढाच नाही, तर विचारात सुधारणाही त्या बरोबर झाली पाहिजे.' खरं-खोटं, सद्गुण, दुर्गुण यांचीही निवड करता आली पाहिजे .... त्याप्रमाणे वर्तनात बदल झाला पाहिजे. .... विचार करण्याची शक्ती, सहनशीलता, कोणत्याही दुःखातून शांतपणे पार पडण्याचा निश्चय, संसारात दक्षता, नीटनेटकेपणा, स्वच्छता, मितव्यय, मुलाबाळांना सुशिक्षा, परोपकारबुद्धी, पतिप्रेम व अपत्यप्रेम इत्यादी सर्व गोष्टींचा समावेश शिक्षण या शब्दात येतो. .. ज्या गुणापासून ज्याचे त्याला त्याचे सभोवतालच्यांना सुख व उपयोग होईल आणि मनुष्याच्या अंगचे चांगले गुण वृद्धी पावतील व वाईटांचा लोप होईल, त्यास शिक्षण म्हणण्यास काही हरकत नाही. आता वाईट कशास म्हणावे व चांगले कशास म्हणावे असा कदाचित तुम्ही प्रश्न कराल, तर त्याचेही उत्तर एवढेच की, ज्या कृत्यापासून दुसऱ्याला त्रास होतो ते वाईट व ज्याचेपासून सुख होते, ते चांगले (पृ. २०२, २०३)

अशा प्रकारच्या चर्चांमधून त्या काळी नवशिक्षित कोणत्या प्रकारे विचार करीत होते, त्यांच्यापुढे कोणते आदर्श होते, याचे दर्शन घडते. तरुणांच्या बदलणाऱ्या मानसिकतेचे हे दर्शन मनोज्ञ तर आहेच, पण त्यातून लेखिकेचा या सगळ्याकडे पाहाण्याचा स्वतंत्र दृष्टिकोण प्रतीत होतो. उदा. मनूचे परखड वक्तव्य. एके ठिकाणी ती म्हणते, '... बायको अशीच हवी, तिला ते अमुकच येत असलं पाहिजे म्हणजेच संसारात सुख होईल, या-सारख्या अटी कशाला हव्या? ... पण तुम्हा पुरुषांची मला गम्मत ही वाटते की, बायकोला नवरा असा असावा असं तुम्हाला स्वप्नात सुद्धा वाटत नाही. आपल्याला सुख झालं म्हणजे झालं. इतकाच तुमचा नेहमी मतलब असतो. तिच्या आवडी नावडीचा विचार तुम्हाला कधीच सुचत नाही.' (पृ. २०३). त्या काळातील सुधारणावादी विचार सुद्धा कसे 'पुरुषकेंद्री' होते हे






मनूच्या या बोलण्यातून नेमकेपणाने व्यक्त करून, लेखिका आपले वेगळेपण दाखवून देते. त्या काळातील लेखकांच्या कादंबऱ्यांत असा विचार आढळत नाही. पुढील काळात वा. म. जोशींच्या 'रागिणी'तील 'नव्या स्त्री' ची प्रतिनिधी उत्तरा या प्रकारच्या विचारांच्या रेषेतील विचार मांडते खरी; पण लेखकाने तिला अखेरीस माघार घ्यायला लावले आहे. काशीबाईंच्या कादंबरीतील मनूच्या विचारांचा बाणा केतकरांच्या कालिंदीच्या जातीचा आहे.

काशीबाई कानिटकरांची दुसरी कादंबरी 'पालखीचा गोंडा' ही होय. ही कादंबरी सन १८९७ मध्ये लिहिली गेली पण; तिच्या प्रकाशनाचा योग 'नवयुग' मासिक निघेपर्यंत आला नाही. 'नवयुगात' कादंबरीची १६ प्रकरणे छापली गेली आणि ते बंद पडले. त्यात या कादंबरीची काही प्रकरणे गहाळ झाली. पुढे सन १९२८ मध्ये पुण्याच्या गणेश महादेव आणि कंपनीने ही कादंबरी प्रकाशित केली. बोलबाला न झालेली, वाङ्मयेतिहासात केवळ नामनिर्देशनापुरते स्थान असलेली ही कादंबरी आहे.

आपण एक चरित्र प्रकाशित करीत आहोत, अशी भूमिका घेऊन या कादंबरीची निर्मिती केली आहे. निवेदिका मनकर्णिका उर्फ मनू आपल्या बहिणीचे म्हणजे रिऊताईचे चरित्र लिहिते; ते योगायोगाने लेखिकेच्या हातात पडते; आणि लेखिका ते प्रकाशित करते अशी घटना 'हे पुस्तक मला कसे मिळाले' या कथानकपूर्व निवेदनात सांगून कथानकाच्या वास्तविकतेची, सत्यपूर्णतेची हमी दिली आहे. गोष्ट काल्पनिक नाही, प्रत्यक्ष घडलेली आहे, हे ठसविण्यासाठी ही युक्ती.

रिऊताई, मनू आणि नाना अशी तीन भावंडे बालपणी मजेत कालक्रमणा करीत असतात. बाहुला-बाहुलीच्या लग्नाचे खेळ खेळत असतात. तेवढ्याच घरात ताईच्या लग्नासंबंधी बोलणी सुरू होतात. आपल्या मुली सुस्वरूप आहेत, तेव्हा त्यांना श्रीमंत स्थळे मिळाली पाहिजेत असे आईला वाटे. अगदी हत्तीची अंबारी नसली तरी पालखीचा गोंडा, मोत्याचा कंठा तरी असला पाहिजे असे तिला वाटे. तसे तिने आपल्या भावाला बजावल्यामुळे तोही तशाच खटपटीत लागतो. एका श्रीमंत संस्थानिकाचे स्थळ आयते चालून येते. आणि ताईचे लग्न होते. लग्नात लक्षात येते की, सगळ्या मंडळींच्या डोळ्यांत धूळ टाकून केलेल्या कारभारीसाहेब आणि राघोपंत यांच्या कारस्थानामुळे ताईचे लग्न एका फार वेड्या संस्थानिक पुत्राशी झालेले आहे. श्रीमंत पण वेडा नवरा ताईला मिळतो. नशिबाचा हा फासा ताई मुकाट्याने स्वीकारते. सासूचा विश्वास संपादन करते. कारभारात लक्ष घालते. तिची हुशारी आणि कार्यतत्परता पाहून सासू संस्थानचा कारभार तिच्याकडे सोपविते. आपल्या भावाकडे शिक्षण घेऊन, त्याच्या व मनूच्या मदतीने ती उत्तम कारभार करते. संस्थानचे रूप पालटून टाकते. येथील उद्योगधंद्याची, व्यापाराची भरभराट होते. पक्का रंग, तांब्या-पितळेचे पत्रे, सर्व तऱ्हेचा लोखंडी व पोलादी माल, वाटेल त्या नंबराचे सूत, लोकरी व रेशमी कपडा असा विविध प्रकारचा आणि परदेशी वाटावा इतका गुणवत्तापूर्ण व आकर्षक माल तिथे तयार होऊ लागतो. रोजगार वाढतो. स्त्रियांच्या बाबतीत ताई अधिकच दक्ष राहाते. घरे-दारे नसलेल्या, सासरी जाच झाल्यामुळे पळून आलेल्या, नवरा सोडून गेलेल्या स्त्रियांचे पालनपोषण करून, त्यांना उद्योगधंद्याचे ज्ञान देऊन चरितार्थ चालविण्यास समर्थ करणारे विद्यालय काढते. निरनिराळ्या खात्यांत काम करण्यास स्त्रियांना प्रोत्साहन व संधी देते. तिच्या संस्थानात कचेऱ्यात, पाहऱ्यावर दुकानात, कारखान्यात, वकीलांच्या मंडळीत-इथून-तिथून सर्वत्र कामगार स्त्री-पुरुषांची संख्या सारख्या प्रमाणावर असते. स्त्रियांच्यासाठी नवे कायदे केले जातात. दारूबंदी, स्त्री-धन व मालकीहक्क स्थापन करणारा नवा कायदा लागू होतो. कारभारासाठी निम्मे पुरुष व निम्म्या स्त्रिया असलेले पंचायत मंडळ स्थापन केले जाते. अशा प्रकारची उत्तम व्यवस्था काही वर्षे राबविल्यानंतर सर्व कारभार लोकांच्या हाती सोपवून ती आपल्या भाऊ-बहिण व नवऱ्यासह विश्वप्रदक्षिणेस जाते; असे या कादंबरीचे कथानक आहे.

हे एक स्त्रीचे स्वप्नरंजन आहे. दैवयोगाने विपरीत परिस्थिती आल्यावर शिक्षण घेऊन त्या परिस्थितीवर मात करून समाजातील दुःखी, अन्यायपीडित स्त्रियांचे दुःख दूर करण्याचे स्वप्न या कादंबरीत रेखाटले आहे. सिगमंड फ्रायडच्या स्वप्नरंजनाच्या साच्यात न बसणारे हे स्वप्नरंजन आहे. यात योगायोग अथवा अद्‌भुत किमया

घडवून तिचा नवरा पूर्ववत होत नाही. त्याच्याकडून लैंगिक सुखाची अपेक्षाही ती करीत नाही. त्याचा तिरस्कार करून दूर लोटीत नाही. नवरा त्रास देणारा नसावा, तो स्वस्थ, शांत असावा इतकी माफक अपेक्षा ठेवून ती काम करते. भोवताली समृद्ध आणि उल्हासपूर्ण समाज निर्माण करते. फ्रायडने स्वप्नमीमांसा पुरुषकेंद्री आणि रतिसुखकेंद्री केली. या कादंबरीतील स्वप्नरंजनाचे केंद्र या दोन्हीपेक्षा वेगळे आहे. सुखापासून अलिप्त राहून सुख निर्माण करण्याचे हे स्वप्न आहे. त्यांच्या मुळाशी असलेली इच्छापूर्तीची भावना विशाल माणुसकीची आहे.

कादंबरीत ताईच्या जीवनाशी या ना त्या निमित्ताने जोडल्या गेलेल्या द्वारकी, ठकी इत्यादींच्या जीवनकथा आहेत. श्रीमंत पण वेडसर नवऱ्यामुळे ताईचे जीवन दुःखमय होते, द्वारकीचा नवरा नाटकमंडळीच्या वेडाने परागंदा होतो म्हणून ती दुःखी होते, ठकीचा नवरा सुशिक्षित आणि भरपूर कमवणारा असतो पण घरी सासू जाच करते त्यामुळे तिचे हाल होतात. तर कुणा स्त्रीचा नवरा दारुडा असल्यामुळे तिच्या संसाराची परवड होते. असे अनेक दुःखी संसार दाखवून, श्रीमंत, गरीब, शिक्षित, अशिक्षित असा कोणत्याही प्रकारचा नवरा असो, स्त्रीच्या वाट्याला दुःखभोग ठरलेला आहे, असा अभिप्राय व्यक्त केला आहे, त्याला उपाय म्हणून प्रौढ विवाहाचा पर्याय कादंबरी सुचविते. ताईच्या विवाहात झालेल्या फसवणुकीमुळे धक्का बसलेले तिचे वडील आजारी पडतात. आणि त्यातच त्यांचा मृत्यू होतो. पाठोपाठ आईही जाते. त्या दोघांच्या मृत्युपत्रात मालमत्तेच्या व्यवस्थे-बरोबरच मनू व नानाने कसे वागावे कुठे राहावे यासंबंधीही लिहिलेले असते. निवेदिका लिहिते, .... त्यात एक गोष्ट त्यांनी वारंवार ध्वनित केली होती, ती ही की, आम्ही दोघांनीही पूर्ण विचार करून लग्न करणं किंवा न करणं हे आपलं आपण ठरवावं. कोणाच्या आग्रहावरून, भिडेनं किंवा लोकापवादासाठी लग्न करू नये. जे करणं ते पूर्ण विचाराअंती करावं. आणि नानानं आम्हा दोघींच्या शिक्षणाला मदत करावी. (पृ. २६५). मनू आणि नाना शेवटपर्यंत अविवाहित राहतात. आपल्या विवाहित बहिणी-मैत्रिणींपेक्षा आपणच सुखी आहोत तसे मनू निभ्रांतपणे म्हणते. (पृ. ११९) आणि एकपरीने विवाह संस्थेचे प्रयोजकत्व नाकारते.

कादंबरीत स्त्री-पुरुष समानतेचा पुरस्कार आहे. हे ताईने संस्थानला जे रूप दिल्याचे चित्रित केले आहे, त्यावरून स्पष्ट होते. शाब्दिक पातळीवरही त्याचा आविष्कार होतो. विधवा झाल्यावर दिराच्या घरात हाल-अपेष्टा काढीत जगणाऱ्या, अन्नाची भ्रांत पडलेल्या स्त्रीची हकीकत ऐकून ताई नानाला म्हणते, '.... नाना, माझ्या संस्थानात तरी पुरुषांच्या कडून बायकांचा असा छळ होता कामा नये. .... आजपर्यंत पुरुषांनी आम्हा स्त्रियांना आपल्या दासीपणाची पदवी घेऊन पर्यायानं आपलंच नुकसान करून घेतलं आहे. त्यासारखी चूक आम्हा स्त्रियांकडून होऊ नये. ... एका वाचून दुसऱ्याचं अस्तित्व असून नसल्यासारखंच जर अनुभवास येतं आणि जगाला दोहोंचीही सारखीच आवश्यकताआहे, तर एकानं दुसऱ्या अर्ध्या जगाला आपल्या ताब्यात पराधीनतेत का ठेवावं? त्या वर्गाला स्वातंत्र्याचा वारासुद्धा लागू नये, असं का?' (पृ. २१५) आपल्या दोन्ही कादंबऱ्यांतून स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या काशीबाई एकोणिसाव्या शतकातील उत्कृष्ट कादंबरीकारांपैकी एक होत्या, हे निःसंशय.

**ई) महाराष्ट्रीय स्त्रियांनी लिहिलेल्या इंग्रजी कादंबऱ्या**

एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्रीय स्त्रियांनी मराठी माणसांचे जीवनानुभव चित्रित करणाऱ्या पण इंग्रजी भाषेचे माध्यम वापरून लिहिलेल्या तीन कादंबऱ्या उपलब्ध आहेत. त्यापैकी एक शेवंताबाई निकम्बे यांनी लिहिली आहे; तर इतर दोन कृपाबाई सत्यनादन यांनी लिहिल्या आहेत.

कृपाबाई सत्यनादन यांचा जन्म सन १८६२ मध्ये अहमदनगर येथे झाला. त्यांचे माता-पिता म्हणजे, हरिपंत आणि राधाबाई ख्रिस्ती हे हिंदुधर्मातून ख्रिश्चन धर्मात गेलेले मुंबई इलाख्यातील पहिले जोडपे होते. कृपाबाई हे राधाबाईंचे तेरावे तर हरिपंताचे चौदाचे अपत्य होते. प्रारंभी आपल्या भावंडांकडे व नंतर झनाना मिशन स्कूलमध्ये कृपाबाईंचे शिक्षण झाले. पुढे इंग्लंडमध्ये वैद्यकीय शिक्षण घेण्यासाठी तिला स्कॉलरशिप मिळाली पण; प्रकृती अस्वास्थ्यामुळे ती जाऊ शकली नाही.

एवढेच नव्हे तर; त्यानंतर मद्रास मेडिकल कॉलेजमधील शिक्षण ही ती प्रकृतीच्या कारणास्तव पूर्ण करू शकली नाही. १८८१ मध्ये तिचे सॅम्युअल सत्यनादन या केंब्रिज युनि. तून शिक्षण पूर्ण करून नुकत्याच परत आलेल्या भारतीय ख्रिश्चन तरुणाशी लग्न झाले. नंतरच्या काळात कृपाबाईने झनाना स्कूलमध्ये भारतीय मुलींच्या शाळेत शिक्षिकेचे काम केले. मुस्लिम मुलींसाठी एक शाळा सुरू केली. या साऱ्या कामाबरोबरच ती काही प्रमाणात लेखनही करीत होती. स्थानिक वृत्तपत्रे, मासिके, नियत-कालिके, यातून ती Indian Lady या नावाने लेखन करीत होती. त्यातील काही भाग Miscellaneous writings of Krupabai Satthianadhan मध्ये समाविष्ट आहे.

कृपाबाई सत्यनादन यांनी दोन कादंबऱ्या लिहिल्या. त्याची पहिली आत्मचरित्रात्मक कादंबरी Saguna : A story of Native Christian Life १८८६ मध्ये प्रकाशित झाली. या कादंबरीने आधुनिक भारतीय स्त्रियांनी लिहिलेल्या इंग्रजी कादंबऱ्यांची मुहुर्तमेढ रोवली. तिची दुसरी कादंबरी Kamala : The story of a Hindu child wife ही तिने अगदी मृत्यूशय्येवर असताना पूर्ण केली. सन १८९४ मध्ये कृपाबाईचा मृत्यू झाला.

'सगुणा' प्रथमतः मद्रास ख्रिश्चन कॉलेज मॅगेझिन मध्ये इ. स. १८८७–८८ मध्ये क्रमशः प्रसिद्ध झाली व पुढे १८९५ मध्ये श्रीनिवास वरदाचारी आणि कं. मद्रासने ती पुस्तकरूपात प्रकाशित केली. सन १८९६ मध्ये तिचे तमिळमध्ये भाषांतर झाले.[१८] अन्य युरोपियन भाषांमध्येही तिची भाषांतरे झाली.[१९] एका कथेतून दुसरी कथा, दुसरीतून तिसरी कथा कशा प्रकारे अनेक कथांची, घटना प्रसंगांची घट्ट, मजबूत वीण असलेली ही कादंबरी आहे. अनेक व्यक्ती, त्यांच्यातील परस्परसंबंध, त्यातून निर्माण होणारे प्रसंग, दंतकथा, गूढता यांचे एक अनोखे मिश्रण या कादंबरीत आहे. कथानकाला ख्रिश्चॅनिटी आणि वसाहतवादाचा संदर्भ आहे. स्त्रियांचे प्रश्न, शिक्षण आणि राष्ट्रीय भावना अशी कादंबरीची आशयसूत्रे आहेत.

ही कादंबरी आत्मचरित्रात्मक आहे. लेखिकेच्या आईवडिलांनी त्यांच्या तरुणपणात धर्मांतर केले होते. त्याचे प्रभावी व हृदयद्रावक वर्णन या कादंबरीत आहे. आईच्या बालपणाचे वर्णन करण्याच्या निमित्ताने रेखाटलेले हिंदूच्या गृहस्थितीचे चित्रणही परिणामकारक आहे. त्याद्वारे, स्त्रीशिक्षणाच्या अभावाचे दुःखमूलक व हानिप्रद किंवा अनर्थकारक परिणाम मनावर ठसतात. या स्त्रियांच्या अवस्थेची जबाबदारी पुरुषांवर आहे याची जाणीव करून देऊन लेखिका म्हणते ..... Poor girls!

सुशिक्षित एतद्देशीय ख्रिस्ती लोकांच्या गृहस्थितीचे वर्णन या कादंबरीत आहे. 'The first Indian New Woman autobiographical novel written in English असे तिचे वर्णन केले जाते. कादंबरीची नायिका 'सगुणा' ची आई राधा हिचा बालविवाह होतो. १८३२-३३ मध्ये बालविवाहितांना कोणत्या प्रकारच्या अनुभवांना सामोरे जावे लागत असे, त्याचे प्रत्ययकारी चित्रण या निमित्ताने लेखिकेने केले आहे. पुढील भागात नायिकेचे शिक्षण, शिक्षण घेताना आलेले अनुभव, भेटलेली माणसे आणि धार्मिक जीवनाचा आलेला उत्कट अनुभव यांचे चित्रण आहे. एतद्देशीय ख्रिश्चनांचे जीवन, युरोपियन मिशनऱ्यांचे व त्यांचे संबंध, स्त्री म्हणून दिली जाणारी दुय्यम प्रतीची वागणूक यांचे चित्रण या कादंबरीत आहे. त्यावरून, एकोणिसाव्या शतकातील एतद्देशीय ख्रिस्ती लोकांच्या जीवनशैलीचा प्रत्यय आपल्याला येऊ शकतो. प्रभावी, सफाईदार भाषा, सृष्टिसौंदर्याची मनोहर वर्णने आणि परिणामकारक प्रसंगचित्रण यामुळे एक चांगली कादंबरी वाचल्याचा अनुभव ही कादंबरी देते. व्हिक्टोरिया महाराणीस ही कादंबरी भेट म्हणून दिली गेली. ती वाचून राणी प्रभावित झाली आणि तिने कृपाबाईचे अन्य साहित्य वाचण्यासाठी मागून घेतले. अन्यत्रही या कादंबरीला वाचकांचा चांगला प्रतिसाद मिळाला.[२०]

'कमला' ही बालपणीच विवाह झालेल्या एका ब्राह्मण मुलीची भावोत्कट शोकांतिका आहे.

समकालीन सवर्ण कुटुंबातील स्त्रियांची मानसिकता आणि जीवनशैली चित्रित करणारी ही कादंबरी आहे. वाचकांचे सामाजिक भान जागृत करणे हे तिचे उद्दिष्ट दिसते. सुधारणेची आत्यंतिक आवश्यकता असलेल्या स्त्रियांच्या अवस्थेचे चित्रण कादंबरीत आहे. ब्रिटिश तसेच इंग्रजी शिकलेला वाचक वर्ग डोळ्यापुढे ठेवून कादंबरीची रचना केली आहे.

कमला एका संन्याशाची मुलगी असते. ती लाडाकोडात पण तरीही स्वातंत्र्याच्या वातावरणात वाढलेली असते. तिच्या वडिलांनी तिला वाचण्या–लिहिण्याचे शिक्षण दिलेले असते. तिचा विवाह एका सनातनी विचाराच्या कुटुंबातील सुशिक्षित तरुणाशी होतो; आणि त्यामुळे तिच्या वाट्याला जो दुःख भोग येतो, त्याचे चित्रण कादंबरीत आहे. कमलाच्या बरोबरीने तिला समवयस्क असलेल्या तिच्या मैत्रिणींच्या संसारांचे चित्रही कादंबरीत आहे. कमलाच्या बरोबरीने तिला समवयस्क असलेल्या तिच्या मैत्रिणींच्या संसारांचे चित्रही कादंबरीत रेखाटले आहे. त्यामुळे १९ व्या शतकातील सासुरवाशीणी स्त्रियांच्या वाट्याला केवढे दुःख, केवढ्या यातना येत होत्या त्याचे भेदक चित्र उभे राहाते. लग्न होऊन ती एका शास्त्र्याच्या घरची सून म्हणून जाते. सासू–नणंदेच्या जाचाला तिला तोंड द्यावे लागते. तिचा नवरा शिकलेला असतो. शहर गावी नोकरी करीत असतो. सुरुवातीला तो तिला शिकविण्याचा प्रयत्न करतो. पण त्यामुळे कमलाचा होणारा जाच अधिकच वाढतो. पुढे तो एका दुसऱ्या स्त्रीच्या प्रेमात पडतो. कमलेला त्रास देण्यासाठी मुद्दाम रचलेला हा सापळा आहे हे त्याला समजत नाही. त्यामुळे प्रेमाच्या पट्टीने आंधळा होऊन तो कमलेचा छळ करतो. ती गर्भवती असताना अथवा पुढे तिला मुलगी झाल्यावरही त्याच्या वागण्यात फरक पडत नाही. तो तिला घरातून हाकलून देतो. पुढे तिचा बाप मुलगी व नवरा या साऱ्यांचाच मृत्यू होतो. आणि ती तिच्यावर मूकपणे प्रेम करणाऱ्या रामचंद्रचे प्रेम नाकारून विरक्त, परोपकारी आयुष्य जगते असे या कादंबरीचे कथानक आहे. एकोणिसाव्या शतकातील हिंदू कुटुंबाचे चित्रण त्यात आहे. बालविवाहितांना दिली जाणारी वागणूक, स्त्रियांचा सासरी होणारा छळ आणि अपमान यांचे भेदक चित्रण कादंबरीत आहे. स्त्रीवादी दृष्टिकोण प्रकट करणारी भारतीय स्त्रीने लिहिलेली सर्वप्रथम कादंबरी असे तिचे वर्णन केले जाते. शिक्षण घेऊन स्वतंत्र आयुष्य जगणाऱ्या साईचे भरकटलेले आयुष्यही कादंबरीत चित्रित केले आहे. कमला व साई या दोन शिक्षित स्त्रियांचे जीवनचित्रण करून लेखिका, शिक्षित पण संयमी, त्यागी, सेवाव्रती आयुष्याचे उदात्त रूप पसंत करते.

शेवंताबाई निकम्बे यांचा इ.स.१८६५ मध्ये पुण्यातील एका ब्राह्मण कुटुंबात जन्म झाला. १८८४ मध्ये त्या मुंबईतील सेंट पीटर्स गर्ल्स हायस्कूलमधून मॅट्रिक्युलेटची परीक्षा उत्तीर्ण झाल्या. पंडिता रमाबाईंच्या व्यक्तिमत्त्वाने आणि कार्याने प्रभावित होऊन त्यांनी शारदा सदन मध्ये (मुंबई) नोकरी धरली. शारदासदन ही उच्चवर्णीय मुली, तरुण विधवा यांना शिक्षण देणारी ख्रिश्चनांची संस्था होती. गरीब, निराधार, मुलांनाही त्यात आधार दिला जाई. ही शाळा पुढे पुण्याला हलविण्यात आली. मात्र शेवंताबाई निकम्बे मुंबईतच राहिल्या. त्यांनी तिथेच उच्चवर्णीय हिंदू बालविवाहित विधवा व अन्य स्त्रियांसाठी शाळा काढली. या शाळेला सरकारचा आणि सर्वसामान्य लोकांचाही पाठिंबा लाभला. १६ वर्षांमध्ये या शाळेतून १००० स्त्रिया शिक्षित होऊन बाहेर पडल्या.

शेवंताबाई स्टुडन्टस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीशी संबंधित होत्या. शैक्षणिक सुधारणांच्या संदर्भात दिल्ली येथे आयोजित केलेल्या अखिल भारतीय स्त्रियांच्या सभेस त्या उपस्थित राहिल्या होत्या. मिशनऱ्यांच्या शैक्षणिक आणि सामाजिक कार्यपद्धतीचा अभ्यास करण्यासाठी त्यांनी युरोप आणि अमेरिकेचा दौरा केला होता.

'Pandita Ramabai and the Problem of India's Married women and widows' या विषयावरील त्यांचा निबंध विशेष प्रसिद्ध आहे.

'रतनबाई' ही त्यांची कादंबरी इ. स. १८९५ मध्ये मार्शल ब्रदर्स, लंडन यांनी प्रसिद्ध केली. रतनबाई ही एका ब्राह्मण मुलीची जीवन कहाणी आहे. बालपण, बालविवाह आणि पोक्तपणा अशा टप्प्यांमधून पुढे सरकरणारी जीवनकथा या कादंबरीत वर्णिली आहे.

रतनबाई ही पाश्चिमात्त्य जीवनशैली अनुसरणारा वकील पिता आणि अगदी पारंपारिक वळणाची, रुढीप्रिय आई यांची मुलगी असल्यामुळे, आपल्याच घरात, पर्वेकडील व पश्चिमेकडील सांस्कृतिक संघर्षाच्या पकडीत सापडते. समाजैतिहासिक दस्तावेज, म्हणूनही या कादंबरीकडे पहाता येते. घरगुती दिनक्रम (दैनंदिन जीवन) आणि एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील ब्राह्मण कुटुंबातील

कौटुंबिक, धार्मिक जीवनाचे चित्रण या कादंबरीत आहे.

रतन आणि तिची मैत्रिण बालविधवा तारा यांच्या जीवनकथांद्वारा लेखिका १९ व्या शतकातील ब्रिटिशांनी पुरस्कारिलेल्या तीन बहुचर्चित सुधारणांचे चित्रण करते. बालविवाह, विधवांची दु:खी अवस्था व स्त्री शिक्षण ही कादंबरीतील प्रमुख आशयसूत्रे आहेत.

एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्रीय कौटुंबिक जीवनाचे, त्यातील सामाजिक-धार्मिक चालीरीतीचे उठावदार चित्रण या कादंबरीत आहे. वसंतोत्सव, गोव्याची यात्रा, तरुण विवाहित मुलींनी केलेली मंगळागौरीची पूजा इ. प्रसंग तपशिलाने व वेधकपणे चित्रित केले आहेत. रतनबाई, तिच्या वर्गात पहिली येते आणि त्याच वेळी तिचा नवरा बी. ए. च्या परीक्षेत नापास होतो. या घटनांचा परिणाम म्हणून रतनचे शाळेत जाणे बंद होते! या सारख्या प्रसंगांची योजना करून लेखिका तत्कालीन समाजाचा मानसिकतेवर प्रकाश टाकते. अनेकविध घटना प्रसंगातून तत्कालीन महाराष्ट्रीय कौटुंबिक जीवनपद्धतीवर, विचारसरणीवर व मूल्यदृष्टीवर प्रकाश टाकण्यात लेखिका यशस्वी ठरली आहे.

या तिन्ही कादंबऱ्या इंग्रजीत आहेत हे खरे; पण त्यात मराठी शब्दांचा वापरही सढळपणे केला आहे. या कादंबऱ्यांची कथानके महाराष्ट्रात घडतात आणि मराठी माणसांच्या जीवनात घडतात. म्हणून खरे तर, त्यांना मराठी कादंबऱ्याच म्हणायला हवे. १९ व्या शतकात, युरोपमधील वाचकांनीही वाहवा करावी अशा कादंबऱ्या या लेखिकांनी लिहिल्या, हे कौतुकास्पद आहे.

कृपाबाई सत्यनादन यांच्या कादंबऱ्यांचा त्या काळात इंग्रजी वाचकात बोलबाला झाला परंतु; या कादंबऱ्या मराठीत अनुवादित झाल्या नाहीत. 'कमला' चा तामिळ भाषेत अनुवाद झाला पण मराठीत मात्र नाही. काशीबाई कानिटकर यांच्या कादंबऱ्या पुस्तकरूपाने प्रकाशित व्हायला विसावे शतक उजाडावे लागले. साळुबाई तांबवेकरांनी केवळ कादंबरी लिहिण्याचा हेतू मनात आणल्यावर मोठमोठी पर्वतप्राय संकटे त्यांच्यापुढे येऊन उभी राहिली; आणि 'तू यत्किंचित स्त्री जाती असून पुस्तक लिहिणार काय?' असे म्हणू लागली. हे सर्व वास्तव पुष्कळ बोलके आहे. स्त्रियांनी लिहिलेल्या कादंबऱ्याबाबतची ही अनास्था हा केवळ योगायोग नाही.

कादंबरीचा आशय अपरिहार्यपणे सामाजिक असतो. इतर कोणताही वाङ्मय प्रकार हाताळणाऱ्या लेखक/लेखिकांपेक्षा कादंबरीकार (स्त्री अथवा पुरुष) अधिक प्रमाणात, अधिक सजगपणे आणि थेटपणे सामाजिक वास्तवाला प्रतिसाद देत असतो. म्हणूनच १९ व्या शतकातील स्त्री कादंबरीकारांनी तत्कालीन सामाजिक वास्तवाला कसा प्रतिसाद दिला हे पाहणे आवश्यक ठरते.

१९ व्या शतकातील सर्वांत ठळक आणि परिणामकारक अशी महाराष्ट्रातील घटना म्हणजे सत्तांतर! सन १८१८ मध्ये ब्रिटिशांचे महाराष्ट्रावरील राजकीय वर्चस्व दृढ झाले. ब्रिटिशांच्या भारतातील राजसत्तेचे आंतर्बाह्य स्वरूप 'वसाहतवादी' शोषणाचेच होते. भारताचे राजकीय, आर्थिक, सामाजिक तसेच सांस्कृतिक खच्चीकरण करून आपले पाश आवळणे ही या वसाहतवादी यंत्रणेची कार्यपद्धती होती. राजकीय पाश घट्ट करून आर्थिक शोषण करणे हे त्यांचे मूलभूत सूत्र होते. त्यासाठी सामाजिक व सांस्कृतिक खच्चीकरण करून जनतेला दुर्बल करण्याची नीती इंग्रजांनी अमलात आणली.[२१] भारताने इंग्लंडच्या संपत्तीत भर टाकण्यासाठी कच्चा माल व अन्नधान्य पुरविणे आणि तिथल्या यंत्रावर तयार झालेल्या वस्तूंसाठी भारताला हक्काची बाजारपेठ बनवणे हे वसाहतवादाचे सूत्र होते. ही भूमिका ओळखून तिचे विवरण करण्याचे काम दादाभाई नौरोजी, न्या. रानडे, सार्वजनिक काका व गोपाळ कृष्ण गोखले यांनी केले. या कार्याचे पुसटसे पडसाद किंवा ब्रिटिशांच्या नीतितील कुटिलतेचे अंश स्त्रियांच्या कादंबऱ्यांत सापडत नाहीत. महाराष्ट्रभर होणारी बंडे, पसरलेला असंतोष, दुष्काळ यांचेही दर्शन स्त्रियांच्या कादंबऱ्यात घडत नाही. ख्रिश्चन मिशनरी आणि हिंदू यांच्यातील संघर्ष व ताणतणाव स्त्रियांच्या कादंबऱ्यात प्रकटलेले नाहीत. ही नकाराची यादी आणखी पुष्कळ वाढविता येईल म्हणून; नसलेल्या गोष्टींचा उहापोह बाजूला ठेवून काय केले आहे ते पाहाणे अधिक योग्य राहील.

आधुनिक महाराष्ट्राच्या जडणघडणीत 'शिक्षण' हे महत्त्वाचे साधन ठरले. स्त्रियांच्या बाबतीतही ते तितकेच

महत्त्वपूर्ण साधन ठरले. प्रारंभीच्या स्त्री कादंबरीकारांनी हे स्पष्टपणे नोंदविले आहे. शाब्दिक पातळीवर आणि घटना-प्रसंगांतून ते मांडले आहे. शिक्षणामुळे अन्याया-विरुद्ध उभे रहाण्याचे बळ मिळाले, असे किंवा शिक्षणा-मुळे चांगल्या प्रकारे जीवन जगणे शक्य झाले; असे संवेदन सर्वच कादंबऱ्यांतून कमी-अधिक प्रमाणात जाणवते. शिक्षणाचे महत्त्व त्यांनी वारंवार सांगितले आहे.

शिक्षणामुळे पुरुषांना आणि स्त्रियांनाही आपल्या रुढी-परंपरांकडे पाहाण्याची नवी दृष्टी मिळाली. त्याचा परिणाम म्हणून, स्त्रियांची परवशता, त्यांची कुचंबणा, त्यांच्यावर होणारा अन्याय ठळकपणे जाणवू लागला. चव्हाट्यावर येऊ लागला. बालविवाह, वैधव्य, सती यासारख्यां रुढींवर कायद्याचेही शस्त्र वापरले गेले. स्त्रियांच्या प्रश्नांची जटिलता आणि भयप्रदता लोकहितवादी, गो. ग. आगरकर यांच्या लेखनात तसेच, आनंदीबाई कर्वे, पार्वतीबाई आठवले यांच्या आत्मचरित्रात तीव्रतेने जाणवते. रखमाबाई प्रकरण,[२२] पामुनी राजमोहन प्रकरण,[२३] आनंदीबाईंच्या आत्मचरित्रातील पंढरपूरची चुकलेल्या बाईची हकीकत हे प्रकरण किंवा काही समाज-चित्रे प्रकरण,[२४] पार्वतीबाई आठवल्यांच्या आत्मचरित्रातील प्रवासातील अडचणीचे प्रकरण[२५] असा काही भाग उदाहरणादाखल पाहिला तरी; स्त्रियांना त्या काळात कशा प्रकारची वागणूक दिली जात होती, याची कल्पना येते. कादंबऱ्या लिहिणाऱ्या स्त्रियांच्या अवतीभवती या व अशा प्रकारच्या घटना घडत असतील; त्यांनाही काही एक प्रमाणात अनुभव आले असतील. पण त्यांच्या कादंबऱ्यांत मात्र अशा गोष्टींना त्यांनी जागा दिलेली नाही.

दुसरी एक बाब अशी की, एकोणिसाव्या शतकात आणि त्याच्या लगतच्या भूतकाळात, सामाजिक, राजकीय, धार्मिक क्षेत्रात काही स्त्रियांनी आपले कर्तृत्व सिद्ध केले होते. अहिल्याबाई होळकर, राणी लक्ष्मीबाई, बायजा-बाई शिंदे, आनंदीबाई जोशी, पंडिता रमाबाई, सावित्रीबाई फुले, रमाबाई रानडे, कार्नेलिया सोराबजी अशी नावे अगदी चटकन डोळ्यांसमोर येतात. त्या स्त्रिया आमच्या स्त्री-कादंबरीकारांच्या नायिका का झाल्या नाहीत? धडाडीने संघर्ष करणाऱ्या,[२६] प्रसंगी सामाजिक-राजकीय विरोधाला तोंड देणाऱ्या स्त्रियांची उदाहरणे साक्षात घडत असताना, स्त्रियांच्या कादंबऱ्यांत त्यांचे प्रतिबिंब का नाही? कोणी असे म्हणू शकेल की, कादंबरीनिर्मितीची प्रक्रिया गुंता-गुंतीची असते. भोवताली घडणाऱ्या घटना आणि कादंबरी-तील चित्रण यांचा एकास-एक किंवा आरशातील प्रति-बिंबासारखा संबंध अपेक्षिणे अडाणीपणाचे आहे. हे मत मान्य करून ही असे म्हणावेसे वाटते की, हा प्रश्न 'केवळ साहित्यिक प्रश्न' नाही. तो अधिक जटिल असा सांस्कृतिक प्रश्न आहे. त्याचा संबंध स्वातंत्र्याशी आहे. नसलेल्या स्वातंत्र्याशी आहे. स्त्रीचे स्वातंत्र्य एतद्देशीय रुढी-परंपरांशी आणि साम्राज्यकर्त्यांच्या राक्षसी आकां-क्षेशी जखडलेले होते. एका बाजूला सतीप्रथा, बालविवाह, पुर्नर्विवाहास बंदी, देवदासी यासारख्या जाचक रुढी-परंपरा आणि शिक्षणाला विरोध हे सार्वत्रिक चित्र होते. ब्रिटिश राज्यकर्ते आणि त्या काळातील समंजस शिक्षित तरुण वर्ग यांची त्यातून मार्ग काढण्याची धडपड चालू होती. दुसऱ्या बाजूला, इथल्या साम्राज्यविरोधी कारवाया दडपण्यासाठी किंवा त्यांच्या इतर देशांशी चाललेल्या लढ्यात भारतीय भूमीचा जेव्हा ठाणे म्हणून उपयोग होई तेव्हा मोठ्या संख्येने ब्रिटिश सैनिक येत. त्यांची लैंगिक भूक भागविण्यासाठी वेश्या व्यवसायाला चालना दिली गेली. एतद्देशीय स्त्रिया त्यांच्या भोगदासी बनल्या असे भयानक दृश्य होते. एकंदरीत वातावरणच असे कोंदट, घुसमटून टाकणारे, स्त्रीचा स्वतःच्या शरीरा-वरील हक्कही नाकारणारे होते. मोकळा श्वास घेणे दुरापास्त होते. अशा पारतंत्र्याने जखडलेल्या अवस्थेत. स्त्रियांनी कादंबऱ्या लिहिल्या, हेच एक साहस होते. स्वातंत्र्याच्या दिशेने टाकलेले पाऊल होते.

**संदर्भ सूची :**


१) लक्ष्मीबाई टिळक, 'स्मृतिचित्रे' वरदा प्रकाशन, पुणे. आवृत्ती चौथी सन २००० पृ. क्रं. ३१७ ते ३१८.

२) गोविंद बाबाजी जोशी, माझे प्रवासाची हकीकत (रोजनिशी) भाग २. स. छा. छा. प्रथमावृत्ती-१८९६ पृ. क्र. ६५४.

३) विविधज्ञानविस्तार (कादंबरीचा चार्ट) पुस्तक २९,









अंक ७, पृ. क्रं. २००.

४) निलीमा भावे, राजसत्तेच्या फटीमधून पेशवेकालीन स्त्रिया, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, आ. दुसरी सन १९९६ पृ. ५२, ७४ ते ७७.

५) 'यात्रिक क्रमण' हे भाषांतर स्कॉटिश मिशन सोसायटीसाठी हरि केशवजी यांनी गव्हर्नरच्या तत्कालीन कौन्सीलचे मेंबर जेम्स फेरीश यांच्या सूचनेवरून केले.

६) शिशिरकुमार दास, 'ए हिस्ट्री ऑफ इंडियन लिटरेचर' १८००–१९१०, साहित्य अकादमी, दिल्ली, पुनर्मुद्रण, २००५ पृ. ४९९.

७) ज्ञानोदयलेखनसारसूची, खंड दुसरा, भाग पहिला पृ. २५४.

८) तत्रेव पृ. २५४.

९) विविधज्ञानविस्तार, पुष्पकरंडक, वर्ष २२ वे, अंक ८ वा सन–१८९०.

१०) भालचंद्र नेमाडे 'कांदबरी', मराठी साहित्य प्रेरणा व स्वरूप, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई पृ. क्र. १५.

११) सरोजिनी वैद्य 'श्रीमती काशीबाई कानिटकर : आत्मचरित्र आणि चरित्र.' पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, आवृत्ती दुसरी सन १९९१ (रूमाल–उलगडण्यापूर्वी) पृ. २२.

१२) तत्रेव पृ. १४८.

१३) 'आर्यभगिनी'

१४) गोदावरी पंडित 'प्रस्तावना' प्रीतीचा मोबदला अथवा पुष्पगुच्छ आणि वनमाला (उपयुक्त ग्रंथप्रसारक मंडळी, मुंबई) सन १८९०.

१५) गोदावरी पंडित 'नीतिदर्पण अथवा सदुणशतावलि' स्त्रियांचे गद्यलेखन प्र. आ. २००५ मधुनुद्रुत, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृ. २३० ते २३१.

१६) सरोजिनी वैद्य, 'श्रीमती काशीबाई कानिटकर' उनि. पृ. १८८.

१७) प्रतिभा रानडे 'स्त्री–प्रश्नांची चर्चा : १९ वे शतक' पद्मगंधा प्रकाशन पुणे आवृत्ती पहिली २००५ पृ. १७०.

१८) कृपाबाई सत्यनाधन 'सगुणा : अ स्टोरी ऑफ नेटिव्ह ख्रिश्चन लाईफ' आक्सफर्ड प्रेस, लंडन, अ क्रोनोलॉजी ऑफ कृपाबाई सत्यनाधन, पृ.१४.

१९) तत्रेव पृ. १४.

२०) चांदणी लोकुगे 'प्रस्तावना' सगुणा The story of native christian life, oxford university press calcutta, chennai, Mumbai, 1998 पृ. १ ते १६.

२१) डॉ. के. के. चौधरी, झुंजार पुणे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती : २००८ प्रकरण एक पृ. ११.

२२) मोहिनी वरदे 'रखमाबाई एक आर्त' पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. दु. आ. सन १९८१.

२३) गो. ग. आगरकर 'संपूर्ण आगरकर' खंड एक वरदा प्रकाशन सन १९९४ पृ. २८४ ते २८८.

२४) आनंदीबाई कर्वे, 'माझे पुराण' ढवळे प्रकाशन, मुंबई सन १९४४ पृ. ४३ व ५५ ते ५९.

२५) पार्वतीबाई आठवले, 'प्रवासातील अडचणी' माझी कहाणी गोपाळ महादेव चिपळूणकर, हिंगणे सन १९२८ पृ. २५ ते २९.

२६) आनंदीबाई जोशी, पंडिता रमाबाई, झाशीची राणी, आनंदीबाई कर्वे, कारनीलिया सोराबजी, सावित्रीबाई फुले, ताराबाई शिंदे यांचा यात समावेश होतो.



# परीक्षण लेख – दिशांच्या मुळांशी आणि वाटेवरील गाव

## दिलीप धोंडो कुलकर्णी आणि चारुदत्त भागवत यांच्या कविता

प्रा. शरद नावरे

।।१।।

वाटेवरील गावाचा पत्ता शोधण्यासाठी दिशांच्या मुळाशी जायला हवं, हा माझा एकट्याचा शोध नव्हे. दिलीप आणि चारुच्या कविता ज्यांनी त्यांच्या लिहित्या काळात वाचल्या असतील, त्या साऱ्यांना हे जाणवलं होतंच. खुद्द चारु त्याच्या 'मनोगता' त म्हणतो – (दिलीपच्या) व्यक्तिमत्त्वाच्या परिघात आम्ही सारे ओढलो गेलो. त्या अर्थाने त्याच्या अधिपत्याखाली आमच्यातील अनेकजण लिहीते झाले. ..दिलीप धोंडोच्या व्यक्तिमत्त्वा-भोवती या साऱ्यांची लेखनप्रतिभा एकवटली गेली.

।।२।।

'कवीच्या मृत्यू'त चारुने दिलीपबद्दल नेमकं म्हटलय –

तो प्राचीन पुरूषवत् सूर्यास्तात मिसळला नाही
किंवा नव्या जगाच्या उंबरठ्यावर पाय ठेवला
असंही खरं नाही.
.
.
..... जुनं पुस्तक वाचलं म्हणजे
त्यातील विश्व मोकळं होतं
.
.
जुन्या परिचित निर्जीव वस्तूंनी
(...) मोकळं होणं आणि आम्हांला
गोष्टी सांगणं .... (वाटेवरील गाव.पृ.३१)

।।३।।

या जुन्या परिचित निर्जीव वस्तूंमध्ये वाङ्मयीन संस्कारांचा बराचसा भाग होताच आणि कधी वाङ्मयीन संस्कृतीची चेष्टा

ह्यांची वाणी किती सरल
त्यांची गाणी किती तरल ...
(वाटेवरील गाव पृ. ४१)

छकुले विचारवंत पाहून कायमच
तो कुल्ले खाजवायचा. संस्कृतीचे बालकडू
पिल्लावस्थेतच त्यास मिळाले.
(वाटेवरील गाव.पृ. ४६)

तर कधी विपुलपणे येणारे वाङ्मयसंस्कतीचे संदर्भ –

केशव भिकाजीच्या जावे का दुकानात
त्यांच्या खूप गाड्या असतील भरधांव धावतील...
सखाराम बाइंडर मदतीला येतील
.
स्वतःच्याच सरणावर कितीवेळा
गुरूदत्त रडला असेल
.
ईझरा पाऊंडचा भाव घटून औंसावर येऊन पोचला
असेल
.
रचावीत कवने बायांनी आणि आम्ही
तटस्थपणे जिवंत राहावं, हे कविता लिहीणे
विसरून जावं
रामायण महाभारत फक्त सुधीर फडक्यांनी गावं..
(वाटेवरील गाव पृ. १४)

किंवा मर्ढेकरांना स्मरून केलेले समीक्षकाचे कवितेस आवाहन ...

(...) गतशतकांच्या शब्द कपातुन
अधुनिकतेच्या भग्न मनातुन
चौरस्त्यातुन अणुरेणूतुन
शब्ददिठीतुन, यंत्रमिठीतुन
पार नेत अन् पाजिन कॉफी
किंवा काळा चहा हवा तर
इराण्यातल्या तीव्र बशीतुन ...
.
कवितेचा दळभद्री वाणी
शब्दावाचुनि दुकान खोली
.

अनुक्रमणिका






.

अजून घोडी पाला खाते!
शब्द कोरते, सांबरशिंगी!

.

पपं पपंपत सभा गाजविन
श्वासांची मी करून पुंगी
दिक्कालाच्या सीमेवरती
सूचकतेने फेडीन लुंगी.

(वाटेवरील गाव. पृ. ४३)

आणि फिल्मी हिरोची कविता –

तूफान गाडी सोडून
शेट्टी आला.
मला सलाम करून म्हणाला 'बॉस'

पोलीस इनिस्पेक्टरनी निराशेने हात
टेबलावर आपटला.

.

आज खानेमें क्याऽऽ है?
रोटी और आलू की साग. बेटा मूंहाथ धोले
मै
खाना लगाती हूँ

(वाटेवरील गाव. पृ. १७-१८)

।।४।।

दिलीपच्या कवितेतून वाङ्मयीन संदर्भाचे स्वरूप अद्‌भुत-रित्या आणि हेतुपूर्वक बदलते. उदा. – चतुर प्रेयसी, मार्जिना

रांजणात मेलेत चाळीस देव
उकळत्या तेलात भाजून
जळक्या श्रद्धेचा दुर्गंध दाटलाय

(दिशांच्या मुळांशी पृ.१८)

मेलेत ते चोर नव्हेत. देव मेलेत. श्रद्धा जळून गेल्यात. त्याचा दुर्गंध दाटलाय. देव आणि श्रद्धेचे लयास जाणे आपल्या समाजातील जुन्या धारणांच्या लयाचे संसूचन करते. मार्जिनाच्या हातून हा लय घडणे याला अनेकरंगी अर्थ आहेत. नवीन धारणांचा पाया ऐंद्रीयतेवर आणि म्हणून नितळ असणार आहे आणि तीच नांदी देखील आहे स्त्रीच्या सर्वंकष आणि शहाण्या सत्तेची. पुरुषसत्ता ढासळतेय –

माझे पुरुषी दमदार श्वास
साकळलेत केसाळ हातांवर
बोथटलेत दृष्टीचे कंगोरे
झडलेत दात, तुटलीयत नखं
उजाड आहे माझ्या रक्ताचा कमरा

बंद कासवाच्या पेटीत
मी लपून बसलोय
कुरतडत मांड्याचं मायावी मांस

.

ती येईल माझ्या विक्राळ पंजाच्या सावलीत
माझ्या ओठात तिच्या बुरख्याची लक्तरं
ती नग्न, नितळ घाग्यासारखी
ओवली जाईल माझ्या रंध्रारंध्रातून

.

मी खोल झटापटीत
घायाळ, जखमांनी विव्हळ
जयापराजयांनी बेभान

.

काटेरी हौतात्म्याचे एक
नवजात कुंपण

.

.

फाटलेला मुडदा तिनेच शिवून आणलाय
तिनेच पुसलीत भिंतीवरची अश्लील अक्षरं
तिनेच सोललीत कासवं
पिसलीत कबुतरं
पेटवल्यात मांड्यांच्या मशाली
गालांचे कोवळे चिराग
पापण्यांचे महाल उघडून
खोदलीत उःशापांची कमळं
लखलखीत कुप्यात भरून ठेवलेत
निर्भर तेजाळ हास्यं
एक सुवर्णमोहोर तिच्या सुदीर्घ नाभीत
ती येतेय

माझी चतुर प्रेयसी
मार्जिना (दिशांच्या मुळाशी पृ.१८-१९)

ह्याच ऐंद्रीयतेचं आणि नव्या लैंगिकतेचं दर्शन देशपांडेबाईंच्या राज्यारोहणात देखील होतं....

डोळ्यांच्या कडांना थोडंसं ताजं रक्त लावून
देशपांडेबाई हसल्या
हीण मिसळून शुद्ध केलेल्या
सिंहासनावर
चवऱ्या ढाळणाऱ्या काळ्या गुलामाच्या
बळकट दंडाच्या स्नायूंची
फुलपाखरं भिरभिरली

.

लवचिक सडपातळ दुधारी तलवारींनी
बाईंनी कापली
अनेक शुभ्र विचारी मस्तकं
दोन्ही हातांनी स्तन उचलून केले
घोंघावत्या पब्लिकला
अनेक घवघवीत नमस्कार
बाईंनी ठोकरले जाडजूड लाथेने
परकीय नजराणे
स्वकीयांचे अश्रु पुसले
मांसल मठ्ठ हाताने

.

एरीनातील
मत्त पशूंच्या मैथुनाने
बाईंचे डोळे गर्द होत गेले
भर दिवसा झाली
ओटीपोटाच्या कुपीत
गच्च काळी रात्र
बाई परतल्या अंत:पुरात
काळ्या गुलामाचा धरून हात.
(दिशांच्या मुळांशी पृ.१७)

।।५।।

मराठी कवितेतील पारंपारिक धारणांचं स्वरूप एकरंगी नव्हतं. ती कात टाकून दृग्गोचर होऊ पाहणारी नवी त्वचा तरी कशी एकरंगी असणार? दिलीप-चारु ज्या काळात लिहीत होते तो लघुअनियतकालिकांचा काळ महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, सामाजिक इतिहासात अनेक अर्थाने कात टाकणारा होता. बदलांची चाहूल आणि हूल आधी कविंच्या कानी पोहोचते. नवी क्षितिजे आधी त्यांच्या दृष्टीस पडतात. नवे अनुभव कसे कवेत घ्यायचे? त्यासाठी नव्या प्रतिमा घडवाव्या लागतात. नव्या पुराणकथा रचाव्या लागतात. नव्या गोष्टी सांगाव्या लागतात. हे सगळं करणे म्हणजे नव्या जाणिवांची निर्मिती. ती एकाच मार्गाने होईल असे नाही. सुर्वेना सुर्यकुलाचे सभासद म्हणून सगळं झटकून पुन्हा व्यवस्थित आंथरावसं वाटत. नामदेवाला सगळ्या श्रेष्ठ मंडळींना गटारीच्या मॅनहोलमध्ये सडत ठेवावसं वाटतं. दिलीपला जुन्या सांस्कृतिक आणि वाङ्मयीन संदर्भात नवा अर्थ भरावसा वाटतो. जो जे वांछील तो ते लिहो....

।।६।।

दिलीप-चारुच्या कवितांमधील आणखी एक समान धागा व्यस्ततेचा आहे. ही व्यस्तता फार गंभीर नव्हे - मर्ढेकरांच्या पंचगव्यशर खजिल अगाचे च्या जातीतली-

रस्त्यावरून मी चाललेलो
अचानक लक्ष्यात आलं
लोक चमत्कारिक नजरेनं पाहतायत.
काय पाहतायत म्हणून
पाहतोय् तर
मनाचं मांस उघडं लोंबत असलेलं
मग मी ते फणसासारखं हातात धरलं
उगीच कोणाला
संशय यायला नको म्हणून
अहो फणसाळकर
अशी हाक मारली
आणि स्वत:च मागं वळून पाहिलं
(दिशांच्या मुळांशी पृ.१७)

तीच व्यस्तता चारुच्याही कवितेत -

प्रदर्शनाला आतड्यांच्या तिकीट काय लावावं?

.

आमच्या दारात निळ्या रंगाची झाडं आहेत
त्यांना फुले येतात ती रात्री चमकतात.

.

.... माझे

आजे आजे आजोबा
अजून तिथे बसतात–त्या पहा त्या खिडकीत
ताजं वर्तमानपत्र वाचतात.
ते बरं का
जीर्ण पर्णासारखे विदीर्ण आहेत.
काल जो नीलगायींचा कळप आला
सारी शिंगे विसरूनी गेला.
(वाटेवरील गाव. पृ. ३२)

ही व्यस्तता कधी चुटक्यांचं रूप धारण करते –

कवी म्हणाला – माऊली (माऊली म्हटल्यावर
न्यायाधीशांनी केसाचा टोप चाचपला)
.
मग पोलिसांनी रस्त्यावर सांडलेला
कवीचा मेंदू भरून आणला.
.
पुस्तकं मागे टाकून कवी बाहेर पडला
तेव्हा मान वेळावून
रस्ताच कवीला शोधू लागला!
(वाटेवरील गाव. पृ.३४,३६)

दिलीपच्या कविता व्यस्ततेचं आगर –उदा. साल्वोदर दालीसाठी

निमूट माझी मूठ आंधळी अपरात्रीचे कर्कश बोके
आणि तमाच्या भिंतीवरचे घड्याळ देते उघडे ठोके
घड्याळ लांबट उंचसखल अन् घड्याळ वळवी
लांब मिशा
टक्कल पडते आकाशाला अन् वाऱ्याचा तंबू फाटे
पाय सोडुनी गढे हिशेबी घड्याळ खडकावर उफराटे
दालीसाठी पाल चुकचुके बोटांवरची रडति नखे
खिन्न दुपारी उन्हात बसती रंग काढुनी अंगरखे.
(दिशांच्या मुळांशी पृ.२६)

किंवा चुटकाच हवा तर –

भिंतीत
खिळा ठोकावा तिथं
सूज येते
त्यामुळे
सेल्फ पोर्ट्रेट
हातातच घेऊन फिरणं भाग आहे.

नाक्यावर भेटेल तो
हटकून विचारतोच :
हातात काय आहे?
कुणाचं मन दुखवायचं म्हणून नव्हे
पण सहजच
मी म्हणून जातो
तुमच्या मनात जे आहे
ते
माझ्या हातात नाही (दिशांच्या मुळांशी पृ.५६)

।।७।।

कविद्वयांतील समान वैशिष्ट्यांची आपण गणतीच करता होत तर दोघांनी रेखाटलेली व्यक्तिचित्रं पाहायला हवी. दिलीपने त्याच्या मित्रांना वाङ्मयीन अमरत्व दिलंय, काहींची व्यक्तिचित्र काढून (नाना देशपांडेवर दोन कविता, अनिल दामलेवर एक, एक चारुदत्त भागवतवर, एक चंद्रकांत कल्लोळी. काही बुटक्या कविता पवनसाठी. एक सुमनसाठी (सुमन तुला संदेश शुभंकर) आणि एक रझियासाठी (रझियाची लावणी).

यातील एकही कविता म्हणजे त्या त्या व्यक्तिचे खरं किंवा भासमान चित्रण नाही. पण एकादेच चिमुकले असे काही की ज्यावरून त्या व्यक्तिची साक्षात ओळख पटावी साक्षात्कारासारखी –

नाना मधुमधुरा तव गिरा
मिसळीचा आग्या कट आणि बावलेला शिरा
नाना तुझ्या डोळ्यावर मरणाची साय
बेडूक आला गाय आली नाना कुठाय?

नाना देशपांडेचं भावडं साहित्यप्रेम –

जे का मद्यले गांजले जे का गद्यले पद्यले
(गांजले वर छानशी कोटी)
तोचि नाना ओळखावा नाना तेथेची जाणावा.
.
भल्या मोठ्या गालावरच्या
अर्धवट उघड्या डोळ्यासारख्या दुकानात
तू अंधाराच्या लादीसारखा बसून असतोस.
.
भग्न शहजाद्यासारखा
विलासी दारिद्र्याच्या कळा पेहरून










स्वप्नांच्या धुंद रात्रगर्द दुनियेतल्या
मधाच्या रस्त्यांवरून
दंवाचे गजरे बांधून नशील्या गझला ऐकत
तू भटकतोस
.
अमानुष सुंदर जहरील्या सर्पदंशांनी
तुझ्या रक्ताला बहर येतात
आणि हे बहर तुझ्या अंथरुणात
सकाळी पिवळे कुत्सित
डाग ठेवून जातात. (दिशांच्या मुळाशी पृ.४,५)

या कुत्सित थेटपणाला काय म्हणावे.. सर्व व्याकरणांचे, संकेतांचे अन्वयार्थचे आणि वास्तवतेचे मुडदे पाडणाऱ्या या विद्रुपचित्रां (कॅरिकेचर्स)ना कसे गणावे...

वाऱ्यानं एखादा स्कर्ट उघडावा
आणि केसाळ बेढब मांड्या डोळ्यात
भसकन् भराव्यात तशी
तुला जाग येते

उपमा आणि उपमेय दोन्ही कर्मणी प्रयोगात. कर्ता असहाय.

पण असहायतेवर मात करून निर्धाराने नित्यक्रम पार पाडणारा –

दिवसाशी इमान राखायचं ठरवून
तू उठतोस
लाजत हगायला जातोस
संडासातल्या झुरळांच्या संभोगाविषयी
शास्त्रीय विचार करतोस
.
अर्थहीन तिरपा तिरपा चालत
तू अनर्थखात्यात शिरतोस
.
टरकलेल्या कावळ्यांच्यामध्ये बसून
शांतपणे सराईत हातांनी
तू देशाच्या आर्थिक परिस्थितीचे
शवविच्छेदन करतोस.
.
पुढ्यातल्या कागदावरचे अदृश्य लाचार
चेहरे टरकवताना
कधी कधी तुझ्या मनात
काव्य येतं
वाटतं ऑफिसातल्या सगळ्या फायलींचे
कोऱ्या कागदांचे गठ्ठे होऊन जावेत
(दिशांच्या मुळांशी पृ.६)

दिलीपच्या लेखणीचा असा साक्षात्कारी आविष्कार क्रौर्याच्या सीमेवर रेंगाळतो आणि कधी भलताच बालीश बनून (बुटक्या कविता) बालवाङ्मयनिर्मिती करतो –

एकदा बुटका गेला लांब
त्याला दिसला उंचच खांब
बुटका खांबाला झोंबला
बुटक्याचा पाय लोंबला
(दिशांच्या मुळशी पृ.८४)

गोपी ॐ राधा हा बार म्हणजे दिलीपचा विसावा. त्यावरील तीन कवितांना पुशिंच्या त्रिधा राधेचे स्मरण ठेवून तो गोपी ॐ राधा – त्रिधा म्हणतो. अगदी मथळ्यापासून भंकसगिरीला सुरवात. या त्रिधेतील दुसरी कविता बारबाला सुमनसाठी आणि तिसरी रझियासाठी आहे –

ग्लास रिकामा भरुन एवढा
देउन वेफर किंवा चिवडा
पार करी ग माझा वेडा, वेडा माझा पार करी
येताच नाही आता म्हणुनी घरास माझ्या तार करी
इथेच बसतो उगीच हसतो
स्वतावरी रागावुन रुसतो
दारुत सोडा जणु फसफसतो.
.
संदेहाच्या सुबक घरावर
नाहित कौले नाही पाखर
निमर्नुष्य अन् आहे नवथर
केसांचे तू करुनी छप्पर संदेहा आधार करी
येतच नाही आता म्हणुनी घरास माझ्या तार करी
(दिशांच्या मुळांशी पृ.७९)

सुमन प्रेमळ तर रझिया उर्मट, पण दिलीपची विदूषकगिरी किती वेगवेगळ्या रूपात प्रकटते –

कशि अस्मानी सुलतानी तुझि ही रझिया










टिप् म्हणुनी देतो तुला टॅक्स मी जिझिया
सडपातळ तनु अटकर बांधा
कुरळ पालवी कणखर बुंधा
गोपींमधील तू तर राधा
अत्तर न्हाली बहरुन आली बेबाक बदन बगिया

उर्दूशी दिलीपची लगट आणि नंतरचा उल्लूपणा

रंग सावळा कसला, काळा
तंग वस्त्र करि चंचल चाळा
त्याचि शुभ्रता करि घोटाळा
दिनदुनिया दिसते वस्त्रातुन आरपार तुझिया

पुन्हा एकदा वाङ्मयीन मुशाफिरी, निरर्थक पण अप्रतिम-

चांदीच्या वाटीतिल मनुका
तू मदनाची नाजुक धनु का?
की प्रश्नातिल शब्दच जणु 'का'
उर्मट उत्तर होऊन अत्तर घमघमते जगि या

दिलीपचे शब्दलाघव, वृत्तवैभव आणि कवीत्व तो बिनदिक्कतपणे चहाटळपणाचे कामी वापरतो –

ऊन्ह हिवाळी धुक्यात धूसर
त्यात पडावी अल्लडशी सर
अनवट रतिरागाचा तू स्वर
कुच–कामाचे सगळे साचे लावण्याचे तुझिया.
(...उपहासाला भावनेच्या ओलाव्याची किनार देण्याचा मोह कवीला आवरत नाही.)
नारायण हे सगळे नगदी
प्रेमज्वराने पेटुनि अगदी
मिठी मारतिल तुला कागदी
झडेल झुलते झाड ज्वानिचे, होईल मृगि, मृगया
(आणि नंतर शेवटचा सिक्सर–लावणीत अध्यात्म हवेच म्हणून हिच्या शब्दकुडीत अध्यात्मप्राण घालून हिला उठवावी.)
संतांची तू सच्चित्संज्ञा
लावणिची तू भूस्थिरप्रज्ञा
वाट दावशिल का मज अज्ञा
शुष्क जडाचे वृक्ष वडाचे पारंबी तू रझिया
(दिशांच्या मुळांशी पृ.८०,८१)

ही कवितेवरील हुकुमत आणि कुचेष्टेचा सूर अर्थाची अनेक वलयं जागृत करतो. कवितेचा असा खेळ एकदा जरी जमला तरी त्या कवीने आयुष्य सार्थक मानायला हरकत नाही.

आणखी दोन उदाहरणं द्यायचा मोह आवरत नाही. पहिल्यांदा चंदूची कविता –

निरर्थकाचा
चंदू चाहता
उसवत बसला
नवीन झबले
होता होता
रात संपली
अन सूर्याचे
अंडे उबले ...
... दिवसासाठी
चंदू करतो
पुन्हा एकदा
चौकस चेहरा
चौकस चेहरा
मुका आंधळा
अन दोन्ही
कानांनी बहिरा. (दिशांच्या मुळांशी पृ.७२)

खुद्द चारुचं व्यक्तिचित्र रीतिवर्तमानकाळात, लुईस कॅरॉलला स्मरून –

तू एक बूजम प्रकारचा स्त्रार्क आहेस
तू उन्हातान्हात हसतखिदळत हिंडतोस
तू तुझ्या ढोबळ्या मांड्या
दिवसात रात्रीत उघडतोस मिटतोस
तू तुझ्या दाढीत ऊन्ह खेळवतोस
.
तू कधी कधी पोटातल्या उवा वेचून काढून
चहाच्या टेबलावर सोडतोस आणि पोरींची तारांबळ उडवतोस
तू मरणाचं खातोस
तेलकट गुजराथी ढोकळ्यासारखा
भुकेच्या डिशेमध्ये तू ढब्बूपणे पाझरत राहतोस
फावल्या वेळात
तू बेडकांना चड्ड्या शिवतोस
मांजरांच्या आयाळी खाजवतोस










कुत्र्यांना कुरवाळून प्रेमावतोस
सापांच्या सौंदर्याची प्रशंसा करतोस
आणि माझ्या कविता वाचतोस

(दिशांच्या मुळांशी पृ. ७)

या सगळ्या व्यक्तिचित्रांमध्ये चिमटे आहेत, कुचेष्टा आहे, क्रौर्य आहे. पण प्रेमही आहे. विरूपचित्रं असूनही, या लोकांना न ओळखणाऱ्या वाचकालादेखील थेटपणाने कळणाऱ्या काही गोष्टी अशा आहेत की, त्यांनी एक नवाच वाङ्मयीन अवकाश खुला केला आहे. साधेपणाचे हे सोहाळे दिलीपची माणसांबद्दलची लोभसवाणी आसक्ती दाखवतात.

अर्थातच सर्व आधुनिक कवींप्रमाणे दिलीपचे इतर चेहरेदेखील आहेत. ऐंद्रिय पातळीवरून स्त्रीकडे पाहणारे आणि खिन्नतेचे, निस्तब्धतेचे दीर्घ शून्यानुभव. दिलीपची अंधारयात्रा. पण तो वेगळ्या लिखाणाचा विषय म्हणून तूर्तास बाजूला ठेवू या.

।।८।।

तुलनेने चारुने व्यक्तिचित्र लिहिलीत कमी. प्रभाकर पंतांच्या कवितेची गोष्ट (कारेकरांकरीता), आणि दिलीप-चाचा. या कवितांचे स्वरूप पाहिले की त्यामागील उद्देशांच्या वेगळेपणाची जाणीव होते. दिलीप सर्वसामान्यांचं पुनवर्सन व्यस्त सृष्टीत करतो. चारु सामान्य आयुष्यातल्या हरवत निघालेल्या संदर्भांची नोंद करतो –

प्रभाकरपंत जागे होतात
फुटक्या बुरुजाला सामोरे येतात.

.

प्रभाकरपंत
कुठे गेले ते लोक सारे
अल्पाखी कोटांवर गुलाब ल्यालेले?
चांदीचे पानपात्र त्यांचे कोणीतरी जप्त केले.

.

झाले तरी काय, पंत?
घराघरांना फुटले आहेत मनुष्यांचे पाय!
कसले सुमन आणि कोणाचे काय
प्रभाकरपंत, तुमच्यामधील
हॅम्लेटतरी आज कुठाय?

पडद्याआड गेल्याहेत कितीतरी गोष्टी. जे स्मरणात आहे ते एखाद्या दुःस्वप्नासारखे –

पंत पळा!
काळयाशार ज्वाळांनी आवळलाय गळा
भोवळ आणणाऱ्या कड्यांखालती पायरी सुटून
घर अंधारत गेलंय
दिवाभीत चित्कारतो वारा
सळसळतं झाड
प्राणी कोणता आला?

.

गतकाळाचा समंध झाडाखाली चालत आला

.

एवढ्यात माजघरात पाउलं वाजली
पदर सावरीत राधाकाकूंनी चाहूल घेतली
कर्कर् पाळण्याची दोरी वाजली
रित्या कोपऱ्यात वाघुळं फडफडली
अंधारात कोण आलंय का?
खोलीत अडगळीच्या गेलंय का?
तिथे बुद्धीबळाचा पट मांडला असेल
डाव मोठा रंगात आला असेल!

काळ थिजला आहे –

उजेडाचीही शुद्ध नाही
घड्याळ वेळ दर्शवीतच नाहीत.
तैलचित्रातील बुब्बुळांसारखे
त्यांचे लंबक स्तब्ध आहेत
मरणोन्मुख प्याद्यांभोवती प्राचीन हात वळले आहेत.

प्याद्यांचं मरण आणि जुन्या संस्कृतिचा ऱ्हास–विलय-ओसाडी –

'प्रभाकरपंत आहेत का?'
पुराणपुरुष विचारून गेला.
दरवाजाच्या दिण्डीमधून एकाएकी प्रकट झाला तो!
आकाशातील छिद्रांसारखा झळकला – नाहीसा झाला.
दार आपटलं आणि थंडगार वारा
वाड्याभोवती फिरत राहिला.
दिवा फडफडला
पण राधाबाईंनी झाकून घेतला पदरात!

अनुक्रमणिका






झोपाळा तेवढा
एकाकी हलत राहिला.

कवितेत प्रकाशाची वेगवेगळी रूपे आहेत –

(राधाबाईंनी)... पितळी समईत आयुष्य जळू दिलं
ताऱ्यांचे लक्षदीप आभाळात जागे झाले
आणि घनघोर जागृतीच्या
प्रकाशात प्रभाकरपंत बाहेर आले.
कवडशांचा पांढरा वाघ झाडाखाली उभा होता
.
चंद्र अभंग होता.

पण या प्रकाशानिरपेक्ष, काळोख हेच सत्य!

अंधारकोठडीत वळणारा किरण
म्हणजे वास्तविक सूर्याचं मरण
.
काळ्याशार ज्वाळांनी आवळलाय गळा
.
घर अंधारात गेलंय
दिवाभीत चीत्कारतो वारा
.
वाघ सावलीत नि:शब्द झाला
.
अंधारात कोण आलंय का?

ऱ्हासपर्वात जाणवतं ते एकमेव सत्य अर्थात मृत्यूचं–

तळहाताची रेघ अरण्यास भिडली.
.
अरण्याच्या वाटांना
उभा असेलच कुठेतरी
मृत्यूचा अवलिया.

(वाटेवरील गाव. पृ.३७–४०)

।।९।।

चारूच्या दुसऱ्या व्यक्तिचित्राला (दिलीपचाचा) दिलीपच्या रंकाळ्यातील आत्महत्येचा, म्हणजे पुन्हा मृत्यूचा, संदर्भ आहे. पण ऱ्हासपर्वातील मृत्यूसारखा तो अपरिहार्य (उभा असेलच कुठेतरी) नाही – म्हणून व्यस्त आहे. व्यस्त मृत्यूला प्रतिक्रियादेखील व्यस्ततेची-

दिलीपचाचा लबाड मोठा,
रंकाळ्याचा होउन मासा
पाण्यामागील गावामध्ये
दडी मारून बसतो खासा.
पाण्यामध्ये फुटता लाटा
दिलीप लिहितो नव्या कविता,
पाणी जेंव्हा वाहत नाही
दिलीपचाचा न्हात नाही

आणि कितीही टाळायचा म्हटला तरी न टळणारा शोक लघुअनियकालिकांच्या भाषेत प्रकटतोच –

दिलीपचाचा दिलीपचाचा सर्व तारका
तुझ्या भांज्या-भतिज्या,
ऊठ लौकर दात घास
तोंडाला येतोय बघ मरणाचा वास.
.
दिलीपचाचा चूळ भर मुमताज महा चालू आहे.
.
काढ पायताण, हान किरनला
कारेकरांवर लिहिना कविता
दिलीपचाचा हो ऐंद्रिय
गाणं गा आणि तंबाकू खा.

चारुच्या भावविश्वाला व्यापून असणारी युगांताची जाणीव इथेही सुटत नाही.

राकू होकूंचे सरले साम्राज्य
रामभाऊ आले ते अयोध्येत मेले

(आणि रंकाळ्यातील पाण्याला अनुलक्षून एक दुष्ट विनोद करायचा मोहदेखील)

दिलीप तुझं जग आता कायमचे ओले
.
दिलीपचाचा पाहाट झाली
नव्या मनूला आहट आली.

(वाटेवरील गाव. पृ.८०–८१)

।।१०।।

दिलीपच्या प्रभावातून बाहेर पडून चारुची वाटचाल सुरू होते. इथे प्रभाव हा शब्द वापरला, तो सोयीपोटी. (आणि कदाचित येथवरच्या लिखाणाचं तर्कशास्त्र सांभाळावं, म्हणून.) चारु हा पूर्ण स्वतंत्र प्रतिभेचा कवी आहे. त्याने अगदी सुरुवातीपासून स्वत:ची काव्यभाषा (idiom) विकसित केलीय, स्वत:चे अनुभव





शोधलेत, अनुभवांना भिडायच्या स्वतःच्या पद्धती विकसित केल्याहेत, स्वतःच्या प्रतिमा (गाव, वाटचाल) निर्माण केल्याहेत, प्रदेशजाणीव विकसित केलीय —

गावात चमकणारा एक दिवा माझ्या घराचा

.

... आपापलं घर ओळखून
डोळ्यांपुढे जागं करण्याचा
हा जो वैराण प्रदेश, तो आम्ही माणसाळला.

.

माणूस म्हणून आलो ते पाहून
थंडी आली होती मग आम्ही गवत पेटवलं
आणि गावं निरखीत राहिलो.

किंवा आणखीन –

गाव अदृष्य होईतो चाललो असं वाटलं
म्हणून मी आणि माझ्या कुत्र्यानी
मागं वळून पाहिलं

.

पाकोळ्या थिर्रर करून उडाल्या डोंगराच्या हृदयातून
आकाशात वळाल्या. मी डोंगरावर आलो.
तिथं खडकांवर पांढऱ्या फुलांचं
एकच झाड शहारलं होतं. त्याची डहाळी
मी अलगद खुडून घेतली.

(वाटेवरील गाव. पृ.१९,२०)

किती छान आहे! किती सुंदर! रूपकं नाहीत. भाष्ये नाहीत. संसूचन नाही. रचनांचे, शब्दांचे खेळ नाहीत. कोणतीही परा–जाणीव नाही. जे आहे ते इथेच. शब्द जेव्हा समर्थपो अनुभवाचं संपूर्ण वहन करतात तेव्हा त्यातून जीवनाबद्दलची प्रचंड आसक्ती प्रकटते –

आमच्या गावावर आता पाऊस आलाय
उतरलाय प्राचीन वाटांनी

मातीच्या आतवर पोचलाय आणि
दारं मोडलेली घरांची थरथरतायत —
त्यांच्यातूनही फुटेल वाटतं पालवी.
गावं ओली झाली आहेत माझी तुझी.
कणादनी पापण्या गच्च मिटून घेतल्या आहेत
तिकडे पावसानी देऊळांच्या मूर्ती झडत चालल्यात
हे खराय.
त्याचा मात्र हा पहिलाच पाऊस आहे.

(वाटेवरील गाव. पृ.२५)

माझ्या खिडकीबाहेर एक झाड आहे
आणि ते नेहमी वेगळं दिसतं
असं माझी बायको म्हणते
आणि ती हे झाड असते कपडे नेसताना
आरशात बघत केस चाचपते
आणि माझा मुलगा मोठा झाला की
झाडावर चढून एखादवेळ पडेल
घडेल

.

खिडक्यांना मी हिरवा रंग लावलाय
आणि भिंतीवर प्राण्यांची चित्रं लावलीत.
पावसाळा आला की त्यावर ओघळ येतील
आणि माझ्या घराच्या भिंती
उन्हाळ्यात हळुहळू वाळत जातील.
लहान सहान गोष्टींवर विजय मिळवणं
आणि गोष्टी बिनशर्त स्वीकारणं
हे मी शिकत आलोय. कविता वाचून
लिहीत आलोय. उन्हाळ्यात जळतात तशी
पावसाळ्यातही झाडं गळतात
हे मी पाह्यलयं.
म्हणूनच जो झोपलाय मुलगा
त्याच्याकडे मी बघत राह्यलोय

(वाटेवरील गाव. पृ.२६,२७)

कवी म्हणून चारु एका निर्गुणी अवस्थेकडे जातोय. त्याला स्वतःला या प्रवासाची पूर्ण जाण आहे. म्हणूनच कणादसाठी तो लिहितो –

तुला माझ्यापर्यंत यायचं तर
कागदी पानावर उतरावं लागेल
ओळीत उभं राहावं लागेल
माझी अक्षरं व्हावं लागेल.
निर्विकार व्हावं लागेल.










(वाटेवरील गाव. पृ.२८)

आणि नंतर येतं ते या निर्गुणी अवस्थेचं अध्यात्म –
एकाच छिन्नीने घडवलयं आकाश आणि त्यापुढचं
झाड
कविता लिहिणारा हात आणि पहाड
आमची हाक ज्यांमधून विरून जाते. येतात
प्रतिध्वनी हे खरे, पण वाटेवर झऱ्यांना पाणी
नाही.
डोंगरावर वाटेला सुरुवात नाही
शेवट नाही
डोळ्यात लोंबणारी फक्त एक वेळ आहे
आणि पापणीला शुष्क ढगांचा फक्त
शुभ्र स्पर्श आहे.
पाऊस आहे किंवा नाही.
वाऱ्याला कसलेच बंधन नाही. पानं आहेत
किंवा नाहीत

एकाच छिन्नीने घडलयं झाड आणि त्यामागचे
आकाश–पहाड.

(वाटेवरील गाव. पृ.२९)



---

## काल, आज आणि उद्या

### गिरणगावाचा शेवट

— साक्षी

सत्तर वर्षापूर्वी मुंबई हे कापड-गिरण्यांचे गाव होते. त्या वेळच्या मुंबईत साठ कापड-गिरण्या होत्या. परळ, लालबाग, भायखळा इ. भागात कामगारांची मोठी वस्ती होती. म्हणूनच या विभागाला गिरणगाव म्हणत. हे कामगार बहुतेक कोकणातून आलेले होते व परस्परातील भावकी, एकाच गावातून आल्याचा आपलेपणा, चाळीतल्या म्हातारीच्या खानावळीत शेजारी बसून होणारे जेवण, गिरणीतील एकाच खात्यात काम अशा अनेक नात्यांनी त्यांच्यात परस्परांशी घट्ट एकोपा निर्माण झाला होता. गिरणी कामगार व गिरणगाव यांच्यावर कम्युनिस्ट कार्यकर्त्यांचा मोठा पगडा होता. कॉ. डांगे, कॉ. देशपांडे, कॉ. निमकर, कॉ. भोगले, कॉ. पाटकर वगैरे धुरंधर पुढाऱ्यांनी १९२८ सालापासून अनेक कष्ट सोसून, अनेक आपत्तींना तोंड देऊन, सुखदुःखात कामगारांची साथ करून एक चिरेबंद संघटना उभी केली होती. यामागे मार्क्सवादी विचारसरणीचा मोठा आधार होता. कम्युनिस्टांनी उभारलेली कामगार चळवळ ही कामगारांना बोनस, रजा, महागाई भत्ता, पगारवाढ, कामाचे नियमित तास इत्यादी बाबतीत अनेक सवलती आणि लाभ मिळवून देत होतीच; पण चळवळीचे मूलभूत उद्दिष्ट भांडवलशाही खिळखिळी करून कामकरी-कष्टकरी वर्गाकडे सत्ता खेचून आणणे हे होते. हे उद्दिष्ट कामगारांच्या मनावर बिंबवण्याचे काम कम्युनिस्ट कार्यकर्ते द्वार सभा घेऊन, चाळी-चाळीत बैठका भरवून, अभ्यासवर्ग चालवून, पत्रके वाटून करीत होते.

कम्युनिस्टांनी उभी केलेली कामगार संघटना किती लढाऊ होती? त्याची अनेक उदाहरणे देता येतील. १९२९ साली कॉ. डांगे यांना अटक करायला सशस्त्र पोलिसांची तुकडी गेली. डांगे तेव्हा नागू समाजांच्या वाडीत राहात असत. वाडीला पोलिसांनी वेढा घातला व डांग्यांच्या घरावर मशिनगन रोखली. डांग्यांच्या घरासमोर अखंडबारी मिल (म्हणजेच स्टँटर्ड मिल) होती. तेथील कामगारांनी डांग्यांना निरोप पाठविला की, "आम्ही पोलिसांवर हल्ला करण्याची पूर्ण तयारी करून तुमच्या निरोपासाठी थांबलो आहोत." काही वर्षांनंतर असा प्रसंग घडला की, दिग्विजय मिलच्या गेटावर डांगे व निमकर यांच्यावर बोरकरदादाच्या गुंडांनी हल्ला केला. तेव्हा दीड-दोन हजार कामगार बोरकरदादाच्या अड्ड्यावर चालून गेले व त्यांनी अड्डा उद्ध्वस्त करून टाकला. पुढे २३ जानेवारी १९४६ रोजी काँग्रेसच्या कार्यकर्त्यांनी कम्युनिस्ट पक्षाच्या गिरगावमधील कार्यालयावर हल्ला केला. हजार-पाचशेचा जमाव कार्यालयावर चालून आला आणि जमावाने दगडफेकीला सुरुवात केली. इमारतीला लोखंडी सरकता दरवाजा होता. त्यावर दगडाचे घाव घालून तो फोडण्याचा उद्योग जमावातील हिकमती लोकांनी सुरू केला. तेव्हा कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनी वरच्या मजल्यावरून जमावावर दगड फेकण्यास सुरुवात केली. कॉ. जी. एल्. रेड्डी व के. आर् काटदरे यांच्यासारखे बेडर कार्यकर्ते लाठ्या घेऊन हल्लेखोरांवर चालून गेले. रस्त्यावर अक्षरशः पानिपतच झाले. जखमी कॉम्रेड्स्ना कार्यालयात उचलून नेत व महिला कार्यकर्त्या त्यांना मलमपट्टी करीत. याच वेळी पक्षाच्या मुंबई कार्यालयातून दोन ट्रक्स भरून लाठ्या व लोखंडी सळ्या घेतलेले कार्यकर्ते गिरगावच्या कार्यालयापाशी आले. त्यांनीही हल्लेखोरांवर जबरदस्त मारा केला. इतके झाल्यावर कम्युनिस्ट-विरोधकांनी माघार घेतली. मग पोलिस तेथे आले. त्याच वर्षी १७ फेब्रुवारी रोजी, इंडियन नेव्हल शिप 'तलवार' वरील नौसैनिकांनी बंड केले. मागोमाग बावीस जहाजांवरील नौ. सैनिक बंडात उतरले. इंग्रज सरकारने नाशिक व पुणे येथून गोऱ्या सैनिकांच्या तुकड्या बोलावल्या. अशा निर्णायक क्षणी कम्युनिस्ट पक्षाने बंडवाल्यांना सहाय्य करण्याचा निर्णय घेतला. कामगारांना संपाचा आदेश दिला. संपकरी कामगार रस्त्यावर उतरले व त्यांच्यात आणि सैनिकात झटापटी सुरू झाल्या. बंडखोर जहाजांवर अन्नपदार्थ पाठविण्याचा

अनुक्रमणिका






प्रयत्नही कम्युनिस्टांनी–विशेषतः महिला कार्यकर्त्यांनी केला. त्या प्रयत्नात कॉ. कमल दोंदे मारल्या गेल्या. कम्युनिस्ट चळवळीच्या इतिहासात असे अनेक रोमहर्षक प्रसंग येऊन गेले. प्रत्येक प्रसंगात गिरणीकामगार पक्षाच्याबरोबर ठामपणे राहिला.

अशी ही बुलंद व लढाऊ कामगार चळवळ आता पूर्णपणे नाहीशी झाली आहे. कामगार चळवळच नव्हे तर कामगारवर्गही लोप पावला आहे. सर्व गिरण्या बंद झाल्या आहेत. गिरण्यांच्या जमिनी हजारो कोटी रूपयांना विकण्याची घाई गिरणीमालकांना झाली आहे; तर तिथे मोठमोठी खाते–दुकाने (मॉल्स) बांधावीत, ऐषारामी सदनिका उठवाव्यात, गगनचुंबी इमारती रचून त्यात बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या कचेऱ्यांना जागा द्यावी आणि पैशांच्या राशी तिजोऱ्यात भराव्यात अशी लालसा बांधकाम क्षेत्रातील उद्योगपतींना वाटते आहे. 'भांडवलशाहीशी लढा', 'क्रांतीचा अग्रदूत असणारा कामगार', 'समाजवादी भारतातील समाजवादी महाराष्ट्र' वगैरे संकल्पना हास्यास्पद ठरत आहेत. हे सर्व कसे झाले? मुंबईतून कामगार चळवळ का संपली? भविष्याच्या लाटेवर स्वार होणारे कम्युनिस्ट कार्यकर्ते व त्यांचे प्रेरणादायी तत्त्वज्ञान यांचा पाडाव कसा झाला?

कॉ. गंगाधर चिटणीस हे 'मुंबई गिरणी कामगार युनियन'चे १९७१ पासून २००० सालापर्यंत कार्यवाह होते. मुंबईतील कामगार चळवळ व तिच्यावर असणारा कम्युनिस्ट पक्षाचा प्रभाव यांचा ऱ्हास त्यांनी अगदी जवळून पाहिला आहे. 'मंजिल अजून दूरच!' या शीर्षकाचे आपल्या आठवणी सांगणारे पुस्तक त्यांनी लिहिले असून नुकतेच प्रसिद्ध केले आहे. ह्या 'ऱ्हासपर्वा'चा उलगडा त्या आठवणीतून आपल्याला करता येतो का, ते पाहू या.

**(१)**

कम्युनिस्ट पक्षात दाखल होणे ही सहज करण्याजोगी गोष्ट नव्हती. चार आणे वर्गणी भरून काँग्रसचे सभासद होता येई. पण कम्युनिस्ट पक्ष हा विशिष्ट ध्येयवादावर निष्ठा ठेवून काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचा पक्ष होता. त्यामुळे पक्षाच्या वेगवेगळ्या आघाड्यात अनेक वर्षे स्वयंसेवकी करून, तावून सुलाखून व पक्षाच्या म्होरक्यांच्या कसोटीला उतरल्यावरच या स्वयंसेवकाला पक्षकार्यकर्त्याचा दर्जा मिळे आणि पक्षातील अधिकारीमंडळावर काम करण्याला तो पात्र समजला नाही. अनेक वर्षांच्या उमेदवारीतून स्वयंसेवकाची पक्षाच्या ध्येय–धोरणावरची व विचार–प्रणालीवरची निष्ठा पिळदार व अविचल होत जात असे. पक्षाचे कार्य कसे चालते, निर्णय-प्रक्रिया काय असते याची त्याला माहिती होई. परिणामी, पक्ष-कार्यकर्त्यांमध्ये कडवेपणा व कट्टर ध्येयवाद जोपासलेला असे.

कार्यकर्त्यांच्या या प्रबल संघटनेमुळेच वेळोवळी ज्या चुका पक्षाकडून झाल्या त्या पचवून पक्ष टिकून राहिला व पुनः सरसावून पुढे येऊ शकला. कम्युनिस्ट पक्ष जेव्हा स्थापन झाला त्याच सुमाराला गांधी काँग्रेसपक्षाचे प्रमुख पुढारी म्हणून लोकांसमोर आले व त्यांनी असहकाराची चळवळ सुरू केली. गांधीना अहमदाबाद व मुंबई येथील गुजराती गिरणीमालकांनी व कलकत्त्याच्या मारवाड्यांनी पैशांची मदत केली होती अशी बोलवा होती. त्यामुळे काँग्रेस हा देशी भांडवलशाहीचा पक्ष आहे, असा कम्युनिस्टांचा ग्रह होता. एकोणीसशे वीस ते तीस या दशकात कम्युनिस्ट पक्ष नुकताच बळ व बाळसे धरू लागला होता व साम्राज्यवादी इंग्रज सरकार त्या पक्षाला चिरडून टाकू इच्छित होते. डांगे, घाटे, मिरजकर, मुझफ्फर अहमद इत्यादी पुढाऱ्यांना वारंवार तुरुंगवास भोगावा लागला. या काळात कम्युनिस्ट विचारांचा अभ्यास देशातील चौकस लोक करीत होते, तरी पक्ष किंवा चळवळ म्हणून कम्युनिस्टांचा प्रभाव जाणवत नव्हता. त्या नंतरच्या तीस-ते-चाळीस या दशकात कम्युनिस्टांनी काँग्रेसपक्षात शिरून आपले स्थान बळकट करायचा प्रयत्न करायला हवा होता. त्यासाठी उत्तम संधी गांधींच्या सविनय कायदेभंगाच्या चळवळीने आणून दिली होती. पण कम्युनिस्ट त्या आंदोलनापासून दूर राहिले. साहजिकच सर्वसामान्य लोकांच्या रोषाला ते पात्र झाले. १९२७ साली जवाहरलाल नेहरु हे रशियाला भेट देऊन आले. मागास असा रशियासारखा देश कम्युनिस्ट राजवटीखाली औद्यागिकरणाच्या दिशेने वेगाने उत्साहाने प्रगती करत होता, हे पाहून ते प्रभावित झाले. त्यांच्या प्रेरणेने काँग्रेस समाजवादी पक्ष स्थापन झाला;




खुद्द जवाहरलाल नेहरु मात्र या पक्षात सामील झाले नाहीत. या पक्षाचे नेते जयप्रकाश नारायण यांनी कम्यु-निस्टांना काँग्रेस समाजवादी पक्षात येण्याचे निमंत्रण दिले. त्याचा फायदा घेऊन कम्युनिस्ट पक्षाचे कार्यकर्ते काँग्रेसमध्ये गेले. छत्तीस सालच्या फैजपूर काँग्रेसच्या अधिवेशनाला डांग्यांनी शेतकऱ्यांचा मोठा मोर्चा काँग्रेसच्या मांडवावर नेला. सदतीस सालच्या निवडणुकात कम्यु-निस्टांनी काँग्रेसचा प्रचार केला. नंतर लवकरच काँग्रेस समाजवादी पक्षाचे दुसरे नेते मिनू मसानी यांच्या हाती कम्युनिस्टांचे सोव्हिएट युनियनशी जे लागेबांधे होते त्यांचे पुरावे लागले व काँग्रेस समाजवादी पक्षातून कम्यु-निस्टांची हकालपट्टी करण्यात आली. हा इतका इतिहास देण्याचे कारण असे की, देशातील राष्ट्रवादी चळवळीशी कम्युनिस्ट पक्ष कधीच एकरूप होऊ शकला नाही, हे ध्यानात यावे. असे होण्याची दोन कारणे होती; पहिले हे की, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीचे नेतृत्व करणारा पक्ष जो काँग्रेस तो भांडवलशाहीचा पुरस्कर्ता आहे ही, कम्युनिस्टांची दृढ समजूत व दुसरे म्हणजे कम्युनिस्ट पक्षावर असलेला ब्रिटन व सोव्हिएट यूनियन या देशातील कम्युनिस्ट पक्षांचा प्रभाव.

कम्युनिस्ट पक्षाच्या देशबाह्य बांधिलकीचा विदारक अनुभव राष्ट्रवादी चळवळीच्या कार्यकर्त्यांना १९४२ सालच्या 'हिंदुस्थान छोडो' आंदोलनाच्या वेळी आला. दुसरे महायुद्ध ३ सप्टेंबर १९३९ या दिवशी सुरू झाले. त्या वेळी रशिया व जर्मनी यांच्यात संगनमत होते. त्यामुळे इंग्लंडने जर्मनीशी पुकारलेले युद्ध ही साम्राज्य-शाह्यांमधील झटापट आहे, असे मानून कम्युनिस्टपक्ष लढाईला विरोध करीत होता. १ जून १९४१ रोजी जर्मनीने रशियावर हल्ला केला व इंग्लंडने-रशियाने मदत मागितली नसतानाही रशियाला मदत करण्याचे आश्वासन दिले. ताबडतोब कम्युनिस्ट पक्षानेही धोरण बदलून हे 'हे लोकयुद्ध आहे', असे जाहीर केले व हिंदुस्थानातील इंग्रज सरकारच्या युद्ध प्रयत्नांना सर्वतोपरी साथ दिली. साहजिकच ९ ऑगस्ट १९४२ रोजी काँग्रेसने 'हिंदुस्थान छोडो' आंदोलन सुरू केले त्याला कम्युनिस्ट पक्षाने विरोध केला. या काळात कॉ. विष्णुपंत चितळे यांच्या-सारख्या पक्ष कार्यकर्त्यांनी व्यक्तिगत पातळीवर काँग्रेसच्या चळवळीला पाठिंबा दिला होता. पण कम्युनिस्ट पक्ष मात्र स्वातंत्र्य चळवळीला या निकराच्या लढ्याला विरोध केल्यामुळे बदनाम झाला व त्या पक्षाचे मूळपीठ जे गिरणगाव तेथील त्याचे वर्चस्वही डळमळीत झाले.

पक्षाला परिस्थितीचा नीट अंदाज आला नाही. त्याच्या चुकीच्या धोरणामुळे पक्षावर अरिष्टे आली. परंतु, पक्ष अशा प्रतिकूल परिस्थितीतही तग धरून राहिला व दरवेळी जोमाने कार्य करू शकला याचे कारण पक्षापाशी असणारी निष्ठावंत व ध्येयवादी कार्य-कर्त्यांची भक्कम फळी हेच होते. कॉ. चितळे यांचा ४२ च्या लढ्याचे वेळी पक्षाच्या धोरणाला विरोध होता खरा; पण त्यामुळे त्यांनी पक्ष सोडला नाही. मार्क्सवादावरचा त्यांचा विश्वास, भांडवलशाहीशी लढा देण्याची उमेद, देशात साम्यवादी सरकार स्थापन करूच ही जिद्द व तळागाळातील समाजाशी एकरूप होऊन सातत्याने काम करीत राहाण्याचा चिवटपणा या गुणांमुळे पक्ष कार्यकर्ते कणखरपणे ठाम राहिले. या कारणांनी पक्ष उखडला गेला नाही. कदाचित् थोडा कमकुवत झाला असेल.

(२)

पक्षाला विशिष्ट तत्त्वज्ञान होते, निश्चित ध्येयवाद होता, या दोन्हीवर निष्ठा ठेवून निखलसपणे कार्यरत असणारे कार्यकर्ते होते; पण त्याबरोबरच पक्षात गटबाजीही होती. हे गट, पक्षाच्या दृष्टीने भांडवलशाहीशरण पण तरीही स्वातंत्र्यलढ्याची धुरा घेतलेला असा जो काँग्रेसपक्ष, त्याच्या बाबतीत काय धोरण ठेवायचे या मुद्यावरून निर्माण झाले होते. स्वातंत्र्यापूर्वीच्या काळात पक्षाने काँग्रेसचा आश्रय करून आपले हातपाय पसरावयाचे असा प्रयत्न, मुख्यतः काँग्रेस-समाजवादी-पक्षात शिरून केला, हे आपण पाहिले. नंतर कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या आदेशावरून कम्युनिस्ट पक्षाने काँग्रेसची साथ तर सोडलीच पण बेचाळीसच्या चळवळीला विरोधही केला. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर राज्यावर आलेल्या काँग्रेसपक्षा-विषयी व त्याच्या राजवटीविषयी काय भूमिका घ्यावयाची यावर पक्षात टोकाचे मतभेद झाले.

१९४८ साली कम्युनिस्ट पक्षाची दुसरी अखिल भारतीय पक्षपरिषद भरली. या वेळी झादानोव्ह नावाच्या कम्युनिस्ट विचारवंताच्या एका सिद्धान्ताचा बोलबाला

होता. या सिद्धान्ताचे असे प्रतिपाद्य होते की, सोव्हिएत क्रांतीनंतर जगात दोनच विचारसरणी उरल्या आहेत : समाजवादी विचारसरणी व भांडवलशाही विचारसरणी. जे समाजवादी नाहीत, ते भांडवलशाहीचे पुरस्कर्ते होत. कॉ. रणदिवे हे या सिद्धान्ताचे पुरस्कर्ते होते. हिंदुस्थानापुरता या सिद्धान्ताचा उपसिद्धान्त (करॉलरी) रणदिव्यांनी असा मांडला की, स्वातंत्र्य मिळाले, आता समाजवादासाठीच्या लढाईची तयारी सुरू केली पाहिजे. पक्ष-परिषदेत रण-दिव्यांच्या धोरणाला मोठा पाठिंबा मिळाला. साहसवादी धोरणाचा स्वीकार करण्यात आला. रणदिवे पक्षाचे कार्यवाह झाले.

या साहसवादाला सुरुवात थोडी आधीच झाली होती. आज ज्याचे स्वतंत्र राज्य करावे असा प्रस्ताव आहे तो तेलंगण प्रांत त्यावेळी निजामाच्या राज्यात होता. तेथे कम्युनिस्टांनी शेतकऱ्यांची संघटनाबांधून शेतकऱ्यांना जमीनदार व सावकार यांच्या कचाट्यातून मुक्त करण्या-साठी सशस्त्र लढा चालू केला होता. निजामाचे संस्थान हिंदुस्थानात विलीन झाल्यावरही हा लढा, नव्या धोरणा-नुसार, चालूच ठेवण्यात आला. हैद्राबाद संस्थानावर पाठविलेल्या हिंदी सैन्याने कम्युनिस्टांची ही सशस्त्र बंडाळी कठोर उपाय वापरून दडपून टाकली. शेकडो कार्यकर्ते, कामगार व किसान मारले गेले. या साहसवादाचा दुसरा आविष्कार रेल्वेच्या संपातून झाला. त्या वेळेला 'ऑल इंडिया रेल्वेयेन्स फेडरेशन' नावाची रेल्वे कामगारांची एकमेव संघटना होती व जयप्रकाश नारायण तिचे अध्यक्ष होते. कम्युनिस्टांच्या नियंत्रणाखालील रेल्वे–कामगारांच्या संघटना फेडरेशनमध्येच सामील होत्या. संप फेडरेशनने पुकारला होता व सरकारशी तडजोड करून तो–सुरू करण्यापूर्वीच–मागेही घेतला होता. पण कम्युनिस्ट संघटनांनी तडजोड फेटाळून संप घडवून आणला. सर-कारनेही दडपशाही केली व रेल्वेतून नव्हे तर इतर शासकीय सेवातूनही कम्युनिस्टांची हकालपट्टी केली. कम्युनिस्टांची आरेरावी आयटक या अखिल भारतीय कामगार संघटनेतही दिसून आली. स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी काँग्रेसने इंटक ही कामगार संघटना स्थापन करून आमटकमधून अंग काढून घेतले होते. तरी एस्. एम्. जोशी यांच्या सारखे, कम्युनिस्ट नसणारे पण समाजवादी, नेते आयटकला धरून होते. आता कम्युनिस्टांनी त्यांना आयटकमधून घालवून दिले व आयटक सर्वस्वी आपल्या नियंत्रणाखाली आणली. पण ही नवी आयटक खूपच दुर्बल झाली होती.

साहसवादी धोरणामुळे कम्युनिस्ट पक्षाची पीछेहाट झाली होती. राजकारणात तो पक्ष वाळीत पडल्यासारखा झाला होता. याची दखल आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीने घेतली व भारतीय कम्युनिस्ट पक्षाला कानपिचक्या दिल्या. त्यानंतर साहसवादी डाव्या एकांगी धोरणाचा त्याग करण्यात आला. पक्षाच्या मध्यवर्ती समितीची व राजकीय समितीची पुनर्रचना करण्यात आली. रणदिव्यांची पक्षातून तीन वर्षांसाठी हकालपट्टी करण्यात आली. तेलंगणातील सशस्त्र लढा थांबविण्यात आला. शस्त्राचार करणाऱ्या कम्युनिस्ट टोळ्यांशी संबंध साधून त्यांची समजूत घालण्याचे कठीण काम राजेश्वर राव या धडाडीच्या नेत्याने केले.

याच सुमारास चीनमध्ये साम्यवादी क्रांती झाली. निरक्षर शेतकरी व शेतमजूर यांची संघटना उभारून माओ त्से तुंगने क्रांती यशस्वी केली. त्यामुळे कम्युनिस्टां-तील साहसवाद्यांना नवसंजीवनी मिळाली. हिंदुस्थानासाठी चीनने स्वीकारलेला मार्गच उपयुक्त आहे, असे राजेश्वर रावही सांगू लागले. त्यामुळे नवीन धोरण स्वीकारण्यासाठी साम्यवादाचे माहेर जी सोव्हिएट युनियन तिथून सांगावा आणावा या हेतूने कॉ. डांगे, कॉ. अजय घोष, कॉ. राजेश्वर राव व कॉ. बसव पुनैया भूमिगत अवस्थेत मॉस्कोला पोचले व तेथून नवीन, साहसवादविरोधी ठाम धोरण घेऊन आले. मदुराईला तिसरी पक्ष–परिषद भरली व हे नवीन धोरण अधिकृतपणे स्वीकारण्यात आले.

कम्युनिस्ट पक्षातील व पक्षाच्या इतर राजकीय पक्षांशी असलेल्या संबंधातील घडामोडींचा हा आढावा घेण्याचे कारण असे की, गिरणी कामगारांच्या संघटनेवर या सर्वांचे फार महत्त्वाचे परिणाम घडून आले.

(३)

मुंबईतील गिरणी कामगारांवरील कम्युनिस्टांची पकड कमी करण्यासाठी पहिल्यांदा काँग्रेसमधील गांधीवादी गटाने प्रयत्न सुरू केले. गं. दे. आंबेकर हे कट्टर गांधीवादी






होते. गांधींनी स्थापन केलेल्या, अहमदाबादमधील गिरणी कामगारांच्या 'मजूर महाजन' या संघटनेत त्यांनी उमेदवारी केली होती. त्यांनी १९३८ साली 'राष्ट्रीय गिरणी कामगार संघ' स्थापन केला. आंबेकरांनी ही संघटना नावारूपाला यावी म्हणून खूप कष्ट घेतले. कम्युनिस्टांच्या प्रभावाखालील कामगारांना आपल्या संघटनेकडे आकर्षित करावे यासाठी ते चाळी-चाळीतून जात व रुग्णाईत कामगारांना व त्यांच्या कुटुंबीयांना होमिओपॅथीच्या गोळ्या देत फिरत. पुढे १९४५ मध्ये स. का. पाटलांनी 'बॉम्बे मिल मजदूर युनियन' काढली. लवकरच आंबेकरांची संघटना व मजदूर युनियन यांना एकत्र आणून 'राष्ट्रीय मिल मजदूर संघ' स्थापण्यात आला. १९४७ साली 'इंटक'ची स्थापना झाल्यावर त्या अखिल भारतीय कामगार संघटनेशी हा राष्ट्रीय मिल मजदूर संघ (रामिमसं) संपन्न झाला.

काँग्रेस समाजवादी पक्षाचे अशोक मेहतांसारखे पुढारी (रामिमसं) मध्येच होते. ४८ साली समाजवादी काँग्रेसमधून बाहेर पडले आणि त्यांनी 'समाजवादी पक्ष' स्थापन केला. या समाजवादी मंडळींनी रामिमसं ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला. 'रामिमसं'च्या कार्यकारिणीच्या निवडणुका होत्या, त्यासाठी या समाजवाद्यांनी उमेदवारी अर्ज भरले. १९४२ च्या लढ्यापासून समाजवाद्यांच्या आकांक्षा वाढल्या होत्या. पण स. का. पाटील प्रभृती काँग्रेस पुढारी इरसाल होते. त्यांनी रामिमसंच्या घटनेतच असे कलम घातले होते की, 'रामिमसं'चा पदाधिकारी काँग्रेसचा सभासद असलाच पाहिजे. त्यामुळे समाजवाद्यांचा डाव फसला. तेव्हा समाजवाद्यांनी 'मिल मजदूर सभा' स्थापन केली. अशा रीतीने स्वातंत्र्य मिळाल्यावर लागलीच मुंबई गिरणी कामगारांच्या परस्परांशी स्पर्धा करणाऱ्या (कम्युनिस्टांची 'गिरणीकामगार युनियन' धरून) तीन संघटना झाल्या.

कामगारांची संघटना बळकट होऊ लागली तसतशी सरकारनेही कायद्यांची आखणी करून संघटनांना वेसण घालण्याचा प्रयत्न केला. १९२९ साली मुंबई सरकारने 'ट्रेड डिस्प्यूट्स् ॲक्ट' मंजूर केला. पुढे १९४६ साली त्या वेळच्या काँग्रेस सरकारने 'बॉंबे इंडस्ट्रियल रिलेशन्स ॲक्ट' पसार करून घेतला औद्योगिक संबंधांचे नियमन करणाऱ्या कायद्याने दोन तत्त्वे स्वीकारली पाहिजेत. पहिले असे की, गुप्त मतदानाने कामगारांनी आपली प्रातिनिधिक संघटना ठरवावी; दुसरे हे की, सामुदायिक हुज्जत (कलेक्टिव्ह बार्गेनिंग) व संप या दोन हक्कांना मान्यता. पण 'बॉम्बे इंडस्ट्रियल रिलेशनस ॲक्ट' (बी. आय्. आर्.) ही दोन्ही तत्त्वे नाकारतो. कम्युनिस्टांची 'मुंबई गिरणी कामगार युनियन' व इतर कामगार संघटनांची ही सततची मागणी होती की, बी. आय्. आर्. रद्द करा. गिरणी कामगारांच्या सर्व संपात हीच मागणी कामगारांनी लावून धरली होती. पण सरकारने व गिरणी मालकांनी ही मागणी मान्य केली नाही. त्यामुळे कागदोपत्री इंटकशी संलग्न असलेली रामिमसं हीच कामगारांची प्रातिनिधिक संघटना राहिली होती.

आपण वर पाहिले की, समाजवाद्यांनी १९४८ साली 'मिल मजदूर सभा' स्थापन केली. त्यांनी १९५० साली बोनसच्या प्रश्नावरून संप पुकारला. कामगारांनी संपाला उत्साहाने पाठिंबा दिला. अशोक मेहता संपाचे पुढारी होते. संपात तडजोड घडवावी व संप मिटवावा असे धोरण सरकारने ठेवले नाही. संप लांबवत न्यावा, दडपशाहीने संप फोडला, गिरणी मालकांच्या गुंडांकरवी संपाच्या नेत्यांवर हल्ले चढवावेत अशी नीती सरकार व मालक यांनी स्वीकारली. दोन महिने संप चालत राहिला तरी कोंडी फुटेना. शेवटी ६३ व्या दिवशी अशोक मेहतांनी वांद्र्याला जाहीर सभा घेतली. (गिरणगावात सभा घ्यायला बंदी होती.) तेथे कामगारांनी आवेशाने निर्णय घेतला की, संप चालूच ठेवायचा. .... आणि दुसऱ्याच दिवशी पहिल्या पाळीला कामगार कामावर गेले; संप मोडीत निघाला. कामगारांच्या नैराश्याचा फायदा घेऊन काँग्रेसच्या राष्ट्रीय मिल मजदूर संघाने सभासदांची घोळक्या-घोळक्याने सभासद म्हणून नोंदणी करून घेतली. इकडे समाजवाद्यांची 'मिल मजदूर सभा' फुटली. अशोक मेहता, महाडिक, राजा कुलकर्णी यांच्याविरुद्ध बापूराव जगताप, गुलाबराव गणाचार्य, राजा कदम या कार्यकर्त्यांनी बंड पुकारले व ते कम्युनिस्टांच्या युनियनला येऊन मिळाले.

१९५५-५६-५७ साली संयुक्त महाराष्ट्राची चळवळ शिखराला पोचली होती. 'संयुक्त महाराष्ट्र समिती'च्या निशाणासाठी काँग्रेसेतर पक्ष एकत्र आले होते. या

काँग्रेस-विरोधी पक्षांपैकी कम्युनिस्ट, प्रजासमाजवादी, लालनिशाण शेतकरी कामगार पक्ष व रिपब्लिकन इ. पक्षांच्या कामगार संघटना होत्या. या सर्व संघटनांनी एकत्र यावे व मोठी 'मुंबई गिरणी कामगार युनियन' (एम् जी केयू) स्थापन करावी अशी मागणी जोराने पुढे आली. एस्. एम्. जोशी (अध्यक्ष) व कॉ. डांगे (कार्यवाह) अशा जोड नेतृत्वाखाली 'एम् जी केयू' अस्तित्वात आली. लाखाहून जास्त कामगार नव्या संघटनेचे सभासद झाले. नंतर बी. आय्. आर्. खाली युनियनने मान्यता मिळण्यासाठी अर्ज केला. मान्यता देणाऱ्या न्यायपीठाने 'राmिमसं' व 'एम्. जी. के. यू.' यांच्या सभासद संख्यांची मोजणी केली. 'एम्. जी. के. यू' ची सभासद संख्या लाखांच्या घरात होती तर 'रामिमसं'च्या सभासदांची संख्या फक्त अडतीस हजार. तथापि, न्यायपीठाने 'एम्. जी. के. यू' ला मान्यता नाकारली! का, तर अर्ज करताना एम्. जी. के. यू. च्या कार्यकारिणीने तसा ठराव केला नव्हता म्हणून! अशा रीतीने मालक-धार्जिणा 'रामिमसं' मान्यताप्राप्त कामगार संघटना म्हणून कायम राहिला.

ही एकत्र संघटना फार दिवस टिकणारी नव्हतीच. महाराष्ट्राची निर्मिती झाल्यावर संयुक्त महाराष्ट्र समितीचे विघटन झाले. प्रजासमाजवादी, रिपब्लिकन हे पक्ष समितीतून बाहेर पडले, त्या मागोमाग त्यांच्या कामगार संघटनाही विभक्त झाल्या. कम्युनिस्ट, लाल निशाण याची मूळ युनियन मात्र थोडी विस्तार पाहूनच कायम राहिली.

(४)

१९५९ साली दलाई लामा तिबेटातून हिंदुस्थानात पळून आला व हिंदुस्थान सरकारने त्याला आश्रय दिला. तेव्हापासूनच हिंदुस्थान व चीन यांच्यातील तंटा सुरू झाला व त्यातून चीन-हिंदुस्थान यांच्यातील सरहद्दी विषयीचा वाद सुरू झाला. या वेळी कम्युनिस्टांमधील जुन्या साहसवादी गटाने पुन: बळ धरले व अशी भूमिका घेतली की, 'सरहद्दीविषयीच्या वादात चीनची भूमिका सयुक्तिक आहे. अमेरिकन साम्राज्यवाद्यांच्या प्रेरणेने हिंदुस्थानाचे भांडवलदारी सरकार हा वाद चिघळवत आहे. श्रमिक जनतेच्या मागण्या व लढे यांच्यावरून लक्ष उडावे या हेतूने सीमावादाला मोठ्या भांडणाचे रूप दिले जात आहे,' कम्युनिस्टांमधील एका गटाची ही विचारसरणी आहे असे पाहताच देशातील प्रसारमाध्यमांनी 'कम्युनिस्ट पक्षाने सीमावादाबद्दलची आपली भूमिका स्पष्ट करावी' असा धोशा लाविला. कम्युनिस्ट पक्षाने आपले अधिकृत मत कधीच प्रसिद्ध केले नाही, पण कॉ. डांग्यांनी मात्र चीनच्या आक्रमक धोरणास जाहीर विरोध दर्शविला.

या वेळी कम्युनिस्ट पक्षात मतभेदांना ऊत आला होता. पक्षाच्या महाराष्ट्र-शाखेत साहसवादी गटाचे प्राबल्य होते. खुद्द रणदिवे महाराष्ट्र कम्युनिस्ट पक्षाचे कार्यवाह होते. शामराव व गोदावरी परुळेकर त्यांच्या साथीला होते. मुंबईच्या कम्युनिस्ट पक्षाचे कार्यवाह होते कॉ. प्रभाकर संझगिरी, कॉ. कुरणे, कॉ. अहिल्या रांगणेकर, कॉ. बापूराव जगताप वगैरे जुने नेते संझगिरींच्या गटाचे होते. हेही साहसवादी होते. ह्या जुन्या, मुरब्बी व संघटना-कुशल मंडळींनी मुंबईशाखा व महाराष्ट्र शाखा यांच्यावर वर्चस्व मिळवून डांग्यांच्या फळीला नेस्तनाबूत करण्यासाठी कंबर कसली. खुद्द डांग्यांनी काहीच हालचाल केली नाही व साहसवादाला विरोध करणारे कॉ. पाटकर किंवा कॉ. प्रभाकर वैद्यही आपली फळी एकसंघ राहावी यासाठी प्रयत्न करीनात. 'लढाई संपल्यानंतर डांगे आपल्या सहकाऱ्यांना वाऱ्यावर सोडतात व मग त्यांची ससेहोलपट होते', असा दोघांचाही अनुभव होता. अशा वेळी कॉ. व्ही. डी. चितळे, कॉ. वसंतराव तुळपुळे, कॉ. मालिनीबाई तुळपुळे (या अलिकडेच १५/१२/०९ ला वारल्या.) व कॉ. कमलाबाई भागवत यांनी पुढाकार घेतला व साहस-वादी आणि चीनला पाठिंबा देणारी भूमिका पक्षात मान्य होऊ द्यायची नाही, या निश्चयाने कार्यकर्त्यांची समजूत घालण्याची मोहीम उघडली. मुंबई शाखेच्या कम्युनिस्ट पक्षाची सभा झाली. तेथे रणदिवे गटाचा पाडाव झाला व पुढे महाराष्ट्र शाखेच्या परिषदेतही चितळे व रावसाहेब कळके यांनी केलेल्या प्रचारामुळे रणदिवेगटाचा पराभव झाला. कार्यवाहपदावरून रणदिवे गेले व कॉ. एस्. जी. सरदेसाई महाराष्ट्र कम्युनिस्ट पक्षाचे कार्यवाह झाले.

मुंबई व महाराष्ट्रात डांग्यांच्या गटाने बाजी मारली








खरी, पण त्या नंतर विजयवाड्याला पक्षाची परिषद भरली. तेव्हा मात्र रणदिवे गटाने बंगाल, आंध्र, केरळ इ. राज्यांतील प्रतिनिधींच्या सहाय्याने राजकीय परिस्थिती-वरील ठरावाला विरोध करून तो ठराव गुलदस्तात ठेवला. कॉ. अजय घोष, दोन्ही गटात सामंजस्य राखणारे नेते त्यांना पक्षाच्या कार्यवाहपदी ठेवण्यात आले. ह्या सर्व गोष्टी चीनने प्रत्यक्ष आक्रमण करण्यापूर्वी झाल्या. चीनचे आक्रमण झाल्यावर इतर पक्षांनी 'कम्युनिस्ट हे चीनचे दलाल आहेत' असा एकत्र गदारोळ माजविला. साहसवादी कम्युनिस्ट पुढाऱ्यांना सरकारने कैदेत टाकले. कॉ. संझगिरी. कॉ. धुमे (हल्लीच्या प्रसिद्ध मेधा पाटकर यांचे वडील), कॉ. एस्. वाय्. कोल्हटकर अशा मुंबईतील पुढाऱ्यांनाही तुरुंगवास घडला.

चिनी आक्रमणाच्या धामधुमीनंतर पक्षाचे कार्यवाह अजय घोष वारले. पक्षातील दुफळी चिघळणार असे वाटू लागले. साहसवादी कम्युनिस्ट तुरुंगात होते, पक्ष बदनाम झाला होता. आता दुफळी झाल्यास दोन्ही गटांना सरकारने दडपून टाकले असते. म्हणून एक जुटीचा देखावा करणे प्राप्त होते. पक्षाने घटनेत दुरुस्ती करून अध्यक्षाचे पद निर्माण केले व त्यावर डांग्यांना बसवले. कॉ. तंबूद्रिपाद हे कार्यवाह झाले.

चिनी आक्रमणामुळे पक्षावर जो राष्ट्रद्रोहाचा शिक्का बसला होता, तो धुवून काढण्यासाठी कष्टकरी जनतेने प्रश्न जोराने पुढे आणण्याचे धोरण डांग्यांनी आखले. लष्करावरील खर्च वाढला होता. नवीन कट व सक्तीची बचत योजना अशा पैसे उभे करण्याच्या योजना सरकारने लादल्या होत्या. या सर्वाविरुद्ध पगारदार लोकात फार असंतोष पसरला होता. याचा फायदा घेऊन पक्षाचे चिखलात रूतलेले तारू राजकारणाच्या मुख्य प्रवाहात आणून सोडण्याचा उपक्रम डांग्यांनी केला. एक लाखाचा मोर्चा संसदेवर न्यायचा व एक कोटी सह्यांचे निवेदन लोक-प्रतिनिधींसमोर ठेवायचे अशी योजना त्यांनी आखली. या निवेदनात बँकांच्या राष्ट्रीयीकरणाचीही मागणी होती.

मुंबई गिरणी कामगार युनियनने या लढ्याचा चांगला फायदा उठविला. एम्. जी. के. यू. मधून समाजवादी बाहेर पडल्यावर संघटना दुर्बल झाली होती. लाल निशाण पक्ष व शे.का.पक्ष युनियनमध्ये होतेच. त्यामुळे मुळातल्या, एकट्या कम्युनिस्टांच्या, युनियनपेक्षा ही एम्. जी. के. यू. जास्त सामर्थ्यवान होती. ही नवी मोहीम हाती आल्यावर कार्यकर्ते अटीतटीने कामाला लागले. गिरणी-गिरणीवर गेट-सभा घेऊन सह्या गोळा केल्या. मुंबईतून एम्.जी.के:यू. चे नऊशेहून जास्त स्वयंसेवक दिल्लीला गेले. मोर्चा अतिशय यशस्वी झाला. मरगळून पडलेल्या कम्युनिस्ट पक्षात चैतन्य आले. तथापि, या सर्व आंदोलनात साहसवाद्यांशी जवळीक ठेवणारे पक्षकार्यवाह तंबुद्रीपाद यांचा सहभाग सुमारच होता.

जवाहरलाल नेहरु हे मुरब्बी राजकारणपटू होते. समाजवाद व पुरोगामित्व यांचे एक वलय त्यांनी स्वतः-भोवती लपेटून घेतले होते. खुद्द काँग्रेसपक्षात सत्ताकरण हे सर्वात महत्त्वाचे होते व समाजवाद आणि पुरोगामित्व या केवळ खेळ्या होत्या. स्वातंत्र्यपूर्व काळात नेहरुंनी काँग्रेस समाजवादी पक्ष काढण्यास जयप्रकाश नारायण प्रभृती तरुणांना प्रवृत्त केले. पण स्वतः त्यात सामील झाले नाहीत. स्वातंत्र्यानंतर नेहरुंच्या सत्तास्थानाला धोका निर्माण झाला, तो वल्लभभाई पटेलांनी नेहरुंच्या विरोधाला न जुमानता पुरुषोत्तमदास टंडन यांना काँग्रेसच्या अध्यक्ष-पदावर निवडून आणले तेव्हा पटेल डिसेंबर १९५० मध्ये निवर्तल्यानंतर नेहरुंनी आपल्या अधिकारपदाचा उपयोग करून व रफिअहमद किडवाई आणि ए.पी.जैन या तथाकथित पुरोगाम्यांना हाताशी धरून टंडन यांना काँग्रेसच्या अध्यक्षपदाचा राजिनामा द्यायला लावला. लगेचच त्यांनी जयप्रकाश नारायण यांच्या प्रजा–समाजवादी पक्षाशी वाटाघाटी सुरू करून असा आभास निर्माण केला की, आपल्या समाजवादी धोरणांमुळे आपण काँग्रेसमध्ये एकटे पडलो आहोत. या वेळी जयप्रकाश नारायण यांनी एक १४ कलमी समाजवादी कार्यक्रम नेहरुंपुढे ठेवला. त्यावर नेहरुंनी उत्तर दिले की, "काँग्रेसचा अध्यक्ष व पंतप्रधान या दोन्ही अधिकारपदांच्या मर्यादा सांभाळून मला या कार्यक्रमाबद्दल निश्चित व ठोस स्वरूपाची आश्वासने देता येणार नाहीत." त्यानंतर या वाटाघाटी बंद झाल्या. चिनी आक्रमणानंतर पुनः नेहरुंच्या अधिकारपदाला धोका निर्माण झाला. कृष्ण मेनन यांना राजिनामा द्यावा लागला. मुरारजी देसाई, स.का.पाटील इ. राजकारण्यांचा गट पुढे सरसावला. तेव्हा नेहरुंनी

समाजवादी व पुरोगामित्वाचे वलय झळकावले. खरे तर देसाई यांनी सक्तीच्या बचतीची जी योजना अंदाजपत्रकात मांडली होती तिला संपूर्ण मंत्रिमंडळाची (म्हणजेच नेहरुंचीही) मंजुरी होतीच. पण त्या तरतुदीच्या विरोधात कम्युनिस्टांनी विराट् मोर्चा काढावा अशी चिथावणी नेहरुंच्याच गोटातून आली असण्याची शक्यता आहे. या मोर्चाचे कौतुक करण्यासाठी नेहरुंनी संसदेच्या गच्चीवर जाऊन मोर्चाची पाहाणी केली. त्यानंतर चीनशी असलेल्या भांडणाच्या संबंधात हिंदुस्थानाची बाजू निरनिराळ्या राष्ट्रांना समजावून सांगण्यासाठी नेहरुंनी आपले दूत पाठविले. त्यात त्यांनी डांग्यांची निवड पूर्व युरोपातील कम्युनिस्ट देशांना भेट देण्यासाठी केली. हे काम स्वीकारण्यापूर्वी डांग्यांनी अट घातली की, कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना सोडावे. त्याप्रमाणे जे साहसवादी कम्युनिस्ट अटकेत होते, त्यांची सुटका करण्यात आली.

डांग्यांच्या मागणीवरून साहसवादी कम्युनिस्टांना सोडण्यात आले, असे मानणे भोळसटपणाचे होईल. चिनी आक्रमणानंतर थोड्याच दिवसात साहसवाद्यांना अटक झाली होती. या अटका करण्यामागेही कम्युनिस्टात फूट पाडावी हे धोरण असणारच. चीनने सीमेवरून माघार घेतली. त्यालाही बरेच महिने लोटले होते. साहसवाद्यांना कैदेत ठेवण्याला आता कारण उरले नव्हते. डांगे विरोधी गटाचे कार्यकर्ते बाहेर आले तर कम्युनिस्ट पक्षात वरवर दिसून येणारी एकजूट नाहीशी होईल, असा आडाखा सरकारने बांधला असणार हे स्पष्ट आहे. तसेच झाले. सुटका झाल्यावर या साहसवाद्यांनी गटबाजीला धार आणली. मीरतच्या तुरुंगात असताना सुटकेसाठी डांग्यांनी ब्रिटिश सरकारची माफी मागितली होती असा मुद्दा पुढे आणून त्याच्या समर्थनार्थ डांग्यांची 'ती' पत्रे या गटाने प्रसिद्धीला दिली. पक्षाचे अध्यक्ष डांगे व कार्यवाह नंबुद्रिपाद यांच्यात वर्तमानपत्रातून मुलाखतींच्या द्वारे वाद सुरू झाले. डांगे आणि त्यांच्या बाजूचे कार्यकर्ते यांच्याविषयी कम्युनिस्ट परिभाषेतील 'सुधारणावादी' (रिव्हिजनिस्ट) हा अपशब्द वापरून टिंगल करण्याला सुरुवात झाली. शेवटी साहसवादी गटाने आपल्या कार्यकर्त्यांची परिषद भरवून स्वतंत्रपणे काम करण्याचा निर्णय घेतला. सुधारणावाद्यांनी चुकीच्या मार्गावर नेलेला पक्ष पुनर्रचित करत आहेत; आपणच मूळ पक्षाचा वारसा चालवत आहोत, असा त्यांचा दावा होता. अशा रीतीने भारतीय कम्युनिस्ट पक्ष (मार्क्सवादी) या नावाचा पक्ष अस्तित्वात आला. ई.एम्.एस्. नंबुद्रिपाद हे ज्येष्ठ नेते, केरळमधील पहिल्या कम्युनिस्ट मंत्रिमंडळाचे मुख्यमंत्री, नवीन पक्षाचे कार्यवाह होते. मूळ कम्युनिस्ट पक्ष कम्युनिस्ट पार्टी ऑफ इंडिया या नावाने काम करीत राहिलाच. मुंबई गिरणी कामगार युनियनवर या फाटाफुटीचा प्रतिकूल परिणाम झाला. मार्क्सवाद्यांनी सी.आय्.टी.यू. (सिटू) नावाची नवी अखिल भारतीय कामगार संघटना सुरू केली व त्यांच्या कार्यकर्त्यांनी स्वतःची निराळी गिरणी कामगार संघटना लाल बावटा मिल मजदूर युनियन काढली.

(५)

ह्या इतक्या मोठ्या काळात गिरणीकामगार व गिरणगाव यांचा चेहरा-मोहरा बराच बदलला होता. अगदी १९५० साली, प्रजा-समाजवाद्यांच्या नेतृत्वाखाली जो फसलेला संप झाला तेव्हाही, गिरणीकामगार हा बहुतेक कोकणी व थोड्या प्रमाणात देशावरून आलेला असा होता. गिरणगावात सर्वत्र मराठी भाषा चालत होती. चाळी चाळीतून मराठी भजनी मंडळे होती. पण आता, १९६६ साली, गिरणीकामगारात कोकणी लोक संख्येने कमी झाले होते. देशावरचे लोक वाढले होते आणि मुख्य म्हणजे उत्तर हिंदुस्थानी 'मजदूर' मोठ्या संख्येने मुंबईत आले होते. या भय्ये लोकांना कम्युनिस्ट विचारसरणीची काहीच माहिती नव्हती. लाल बावट्याशी त्यांचा मुळीच संबंध नव्हता. त्यांना तिरंगी झेंडा माहीत होता व तो तर राष्ट्रीय मिल मजदूर संघाच्या खांद्यावर होता.

१९६५-६६ साली गिरणगावात वातावरण तापू लागले होते. कामगारांना वाटत होते की, इतर उद्योगातील संघटित कामगार पगार, भत्ते, सवलती यांच्या बाबतीत आपल्यापेक्षा फार पुढे गेले आहेत. राष्ट्रीय मिल मजदूर संघ 'बी. आय्. आर्'च्या अटींखाली मान्यता मिळवून बसला होता व मालक आणि सरकार यांच्या आश्रयाने वावरत असल्याने कामगारांच्या मागण्यांविषयी उदासीन होता. १९६४ सालचा बोनस ६५ साल संपत आले, तरी मिळाला नव्हता. अशा वेळी एम्.जी.के.यू.ने संपासाठी

कंबर कसली. कामगारांच्या मागण्याची सनद तयार केली. त्यात प्रमुख मागणी हीच होती की, रा.मि.म.संघाची मान्यता रद्द करा व गुप्त मतदानाने प्रातिनिधिक संघटना निवडा. संपासाठीची घुसळण गेटसभा, विभागसभा, मोर्चे, निषेधसंप या मार्गाने चढती ठेवायची असते. या सर्व पायऱ्या पार करून २८ फेब्रुवारी १९६६ रोजी संप सुरू झाला. या पूर्वी कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखाली संप झाला होता, तो १९४० साली; आणि शेवटचा बेमुदत संप, अशोक मेहतांच्या पुढारीपणाने, १९५० साली झाला होता. तेव्हा कामगारांना संपाची सवय उरलेली नव्हती. तरी पंचाहत्तर टक्के कामगार संपात उतरले व संप समाधानकारकपणे पार पडला. ११ मार्च १९६६ ला संप मागे घेण्यात आला. या संपाने लालबावट्याचे गिरण-गावावरील वर्चस्व नव्याने अधोरेखित झाले.

अशा वेळी मुंबईत शिवसेनेचा जन्म झाला. शिवसेनेचे संघटन कोणत्याही हेतूने झालेले असो; कम्युनिस्टांच्या दृष्टीने शिवसेना ही भांडवलदार व प्रतिगामी यांनी घड-विलेले शस्त्र होते. पैसा व इतर मार्गांनी शिवसेनेला बळ द्यायला प्रतिगामी शक्ती व भांडवलदार सज्ज होते. शिवसेनेच्या कार्यकर्त्यांनी लालबावट्याला आपले लक्ष्य केले होते. १९६७ साली पक्षाची राज्य परिषद औरंगाबादला भरली होती. त्या परिषदेसाठी कम्युनिस्ट पक्षाचे मुंबईतील नेते व कार्यकर्ते गेले होते. ती संधी साधून शिवडी विभागातून ४०० शिवसैनिक कम्युनिस्टांच्या कचेरीवर चालून गेले. त्यांनी कचेरी उद्ध्वस्त केली व लुटली. त्यानंतर शिवसेनेच्या गुंडगिरीला सडेतोड उत्तर देण्यासाठी कॉ. डांगे यांनी कामगार मैदानावर जाहीर सभा घेतली. या सभेची 'चोख व्यवस्था' कम्युनिस्टांनी करून ठेवली होती. त्यांचे कडवे कार्यकर्ते सभेत पांगून बसले होते. कॉ. पाटकर यांनी ठाकरे यांच्याविषयी बोलायला सुरुवात करताच शिवसैनिकांनी गोंधळ करा-वयास व व्यासपीठाकडे चाल करण्यास सुरुवात केली. मग कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनी शिवसैनिकांवर चौफेर हल्ला चढवला आणि मोठे रणकंदन १५–२० मिनिटे चालले. बंडू शिंगरे या शिवसैनिकाला जबरदस्त मारहाण झाली.

यानंतर शिवसेनेची वाढ झपाट्याने झाली. ६७ साली झालेल्या निवडणुकात शिवसेनेने काँग्रेस-विरोधी पक्षांना व उमेदवारांना प्रचार करणे अशक्य करून सोडले. कॉ. डांगे, कृष्ण मेनन हे कम्युनिस्टाचे-कम्युनि-स्टांनी पाठिंबा दिलेले-उमेदवार पडले. शिवसेना आक्रमक झाली होती व तिची दहशत पसरत होती. शिवसेनेच्या हल्ल्यांपासून रक्षण करण्यासाठी एक संरक्षक दल स्थाप-ण्याचा निर्णय कम्युनिस्ट पक्षाने घेतला व गिरणगावातील समर्थ नेता कॉ. कृष्णा देसाई यांच्यावर हे काम सोपविले. ते दोन वेळा महापालिकेवर निवडून गेले होते व ६७ सालच्या निवडणुकीत विधानसभेवर त्यांनी निवड झाली होती. देसाई यांनी गिरण-गावातील शंभर-दोनशे जवानांचे दल स्थापन केले. त्यांच्या रोज कवायती होऊ लागल्या. कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाचे धडे हे जवान घेऊ लागले. हुतूतू-स्पर्धा, नाट्यमहोत्सव असे कार्यक्रम हे दल घेऊ लागले. त्यामुळे सेनेच्या दहशतीला व वर्चस्वाला सुरूंग लागेल अशी स्थिती निर्माण झाली. शिवसैनिक पिसाळले; त्यांनी कृष्णाचा काटा काढण्याची योजना आखली व ५ जून १९७० रोजी कृष्णाचा खून झाला. खुनाच्या आरोपावरून दिलीप हारे व इतर सात जणांना अटक झाली. खालच्या कोर्टात हारेला बारा वर्षांची शिक्षा व इतरांना कमी-अधिक मुदतीच्या शिक्षा झाल्या. पण उच्च न्यायालयाने सर्व आरोपींची तांत्रिक मुद्यावरून सुटका केली.

कम्युनिस्ट पक्षाच्या दृष्टीने खरी नामुष्कांची गोष्ट नंतर घडून आली. कृष्णा देसाई आमदार होते. त्यांच्या हत्येमुळे लालबाग मतदार संघाची जागा रिकामी झाली. त्या जागेसाठी पोटनिवडणूक घेण्यात आली. कम्युनिस्टांनी कृष्णा देसाई यांची पत्नी सरोजिनी हिला उमेदवारी दिली. त्यांना काँग्रेस, मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष व इतर पक्ष यांनी पाठिंबा दिला होता. शिवसेनेने वामनराव महाडिक यांना उमेदवारी दिली होती. निवडणूक फार चुरशीची झाली. कम्युनिस्ट व शिवसेना दोघांनीही प्रचाराची शीग गाठली. पण शेवटी वामनराव महाडिक दोन हजार मतांनी विजयी झाले. इथून पुढे 'एम्.जे.के.यु'चे कामगारा-तील वजन उतरू लागले.

दर दोन-तीन वर्षांनी पगार वाढ, बोनस, महागाईभत्ता अशा स्वरूपाचे कामगारांचे प्रश्न उकळीवर येत. गिरणी-मालक व सरकार मान्यताप्राप्त संघटना जी रामिमसंघ हिच्याशी वाटाघाटी करीत. संघाने घडवून आणलेली








तडजोड लालबावटा युनियनला मान्य होत नसे. कामगार संपाला तयार होत.

असाच एक संप 'एम्.जी.के.यु.'ने ३१ डिसेंबर १९७३ पासून ८ फेब्रुवारी १९७४ पर्यंत चालवला. या वेळी मुंबईतील अकरा आजारी गिरण्या केंद्र व राज्य सरकारांनी चालवायला घेतल्या असल्याने लढा काही प्रमाणात सरकारच्या सरळ–सरळ विरोधात होता. त्यामुळेच संप बराच लांबला. याच काळात, १२ जानेवारी १९७४ ला लोकसभेची पोट-निवडणूक झाली. कम्युनिस्ट पक्षातर्फे (सी.पी.आय्.) डांग्यांची मुलगी रोझा देशपांडे उमेदवार होती. रामराव आदिक काँग्रेस तर्फे उभे होते. रोझा देशपांडे निवडून आल्या.

(६)

सदुसष्ट सालच्या निवडणुकीनंतर देशातील घटना-क्रमाने वेग घेतला. एकूण सत्तर साली पंतप्रधान इंदिरा गांधी व काँग्रेस पक्षातील प्रस्थापित नेतृत्व यांच्यात संघर्ष सुरू झाला. वडील जवाहरलाल नेहरु यांनी ज्या-प्रमाणे आपल्या स्थानाला धोका आहे, हे लक्षात येताच समाजवाद व पुरोगामित्व यांची झूल चढविली होती त्याप्रमाणेच इंदिरा गांधींनीही समाजवादी पवित्रा घेऊन काही बँकांचे राष्ट्रीयीकरण केले व माजी संस्थानिकांचे तनखे काढून घेतले. मार्क्सवादी कम्युनिस्टांना इंदिरा गांधींच्या या नवीन धोरणाची भुरळ पडली नाही. पण भारतीय कम्युनिस्ट पार्टी (भाकपा), जिचे अध्यक्ष डांगे होते, हिने मात्र इंदिरा गांधींना पूर्ण पाठिंबा दिला. या वेळी काँग्रेस पक्षात फूट पडून इंदिरा गांधींचे सरकार अल्प मतात गेले होते. अशा वेळी डांगे व भाकपाचे खासदार यांनी ते सरकार टिकवून धरले. ६७ साली डांगे लोकसभेवर निवडून गेले होते.

१९७५ साली अलाहाबाद उच्च न्यायालयाने ७१ साली इंदिरा गांधींची लोकसभेवर झालेली निवडणूक रद्द ठरवली. त्यानंतर इंदिरा गांधींनी देशांतर्गत आणीबाणी पुकारली. भाकपाने याही वेळी इंदिरा गांधींना पाठिंबा दिला. १९६७ पासून ७५ पर्यंत व नंतरही काही काळ भाकपा व काँग्रेस परस्परांच्या अगदी जवळ आले होते. पूर्वाश्रमी कम्युनिस्ट असलेले रजनी पटेल यांना गांधींनी मुंबई शहर काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून नेमले होते. कुमार मंगलम् यांच्यासारखे भाकपाचे कार्यकर्ते काँग्रेसमध्ये जाऊन मंत्री झाले होते. काँग्रेस व भाकपा यांच्यातील फरक पुसट होत चालला होता; निदान डांगे व भाकपा तरी असे धरून चालले होते. या उलट मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष (माकपा) इंदिरा गांधींच्या विरोधात होता. आणी-बाणीची घोषणा झाल्यावर सरकारने (माकपने आणी-बाणीला विरोध केला नव्हता तरी) माकपाच्या कार्यकर्त्यांना तुरुंगात टाकले.

पण आणीबाणीच्या कालखंडाच्या उत्तरार्धात इंदिरा गांधी यांनी, काँग्रेसमधील आपल्या विरोधकांशी लढताना स्वीकारलेली, तथाकथित समाजवादी धोरणे गुंडाळून ठेवली. त्यांचे पुत्र संजय गांधी व त्यांची युवा काँग्रेस यांनी तर कम्युनिस्टांवर कठोर टीका करण्यास सुरुवात केली. साहजिकच भाकपा मधील बहुसंख्य लोकांना व पक्षाचे चिटणीस राजेश्वर राव यांना काँग्रेसच्या उद्देशांविषयी शंका येऊ लागली. ते लोक संजय व त्यांचे पक्षपाती यांचा उल्लेख 'चांडाळ चौकडी' (कॉकस) असा करू लागले. डांग्यांना हे पटले नाही. काँग्रेस हा पुरोगामी पक्ष नाही; पण त्याच्या मदतीने अधिक प्रतिगामी शक्तींचा मुकाबला करता येत असेल, तर काँग्रेसला–मुख्यतः इंदिरा गांधी व संजय गांधी यांना दुखविता कामा नये, असा डांग्यांच्या विचारांचा रोख होता.

७७ साली आणीबाणी शिथिल करून निवडणुका घेण्यात आल्या. त्यात काँग्रेसचा प्रचंड पराभव झाला. भाकपच्या जागाही कमी झाल्या. माकपने जनतापक्षाशी जागा वाटपांचा तह केल्याने माकपचे लोकसभेतील संख्याबळ मात्र वाढले. साहजिकच भाकपमध्ये वाद सुरू झाले आणि आणीबाणीला पाठिंबा देण्यात पक्षाने चूक केली, असा विचार प्रबल होत गेला. डांग्यांचे म्हणणे असे होते की, आणीबाणीला पाठिंबा देणे हे पक्षाच्या त्या वेळच्या धोरणाशी सुसंगत होते. 'पाठिंबा दिला हेच चुकले' असे म्हणायचे असेल, तर पक्षाचे त्या वेळचे एकूणच धोरण चुकीचे होते असे म्हणावे लागेल.

डांग्यांच्या धोरणाला मुंबईतील भाकपशाखेत मोठा पाठिंबा होता. खरे तर आणीबाणीचा त्रास गिरणी काम-गारात काम करणाऱ्या पक्ष-कार्यकर्त्यांना झाला होता. बी.आय्.आर् मुळे गिरणी कामगार युनियनला मान्यता

नव्हती. मालकांशी किंवा सरकारशी युनियनच्या प्रत्यक्ष वाटाघाटी होऊ शकत नव्हत्या. अशा स्थितीत कामगारांचा आवाज मालक किंवा सरकार यांच्यापर्यंत पोचवायचा तर मोर्चा, सभा, संप यांचाच उपयोग करावा लागणार होता. पण आणीबाणीमुळे चळवळीचा मार्ग बंद झाला होता. युनियनच्या कार्यकर्त्यांची कुचंबणा होत होती. तरीही डांग्यांनी आणीबाणीला दिलेला पाठिंबा योग्यच होता असा गिरणगावाचा निर्णय होता.

भाकपची राष्ट्रीय परिषद भटिंग (पंजाब) इथे भरणार होती. परिषदेपुढे मुख्य ठराव 'आणीबाणीला पक्षाने पाठिंबा दिला ही चूक होती' अशा आशयाचा होता. त्याला विरोध करण्यासाठी डांगे-गटाची मोर्चेबांधणी व्हावयाला हवी होती. मुंबईतून व महाराष्ट्रातून डांग्यांच्या बाजूचे प्रतिनिधी परिषदेवर पाठविणे गरजेचे होते. मुंबई शाखेकडून डांगे-गटाचे प्रतिनिधी मोठ्या संख्येने निवडले गेले. पण महाराष्ट्र शाखेच्या परिषदेत मात्र डांगे गटाचा पराभव झाला. या वेळी महाराष्ट्र–भाकप मध्ये कॉ. ए. बी. वर्धन यांचा तारा झळकू लागला. महाराष्ट्र भाकपचे चिटणीस माधवराव गायकवाड व ए. बी. वर्धन दोघेही आणीबाणीला पक्षाने पाठिंबा दिला या निर्णयाच्या विरुद्ध होते. येथून पुढे 'माकप'चा आधार घेऊनच भाकपने चालले पाहिजे, असा दोघांचाही मनसुबा होता. भटिंडा येथील राष्ट्रीय पक्ष परिषदेत 'आणीबाणीला पक्षाने दिलेला पाठिंबा चुकीचा होता' ही भूमिका मंजूर झाली.

यानंतर डांगे गटाचा झपाट्याने ऱ्हास झाला. प्रथम रोझा देशपांडे (डांग्यांची कन्या) व त्यांचा नवरा बानी देशपांडे यांनी 'ऑल इंडिया कम्युनिस्ट पार्टी' हा पक्ष स्थापन केला. डांगे नवीन पक्षात सामील झाले नाहीत; पण या पक्षाची स्थापना १३ मार्च १९८० रोजी मरिन येथे एका मेळाव्यात झाली, त्या मेळाव्याला ते हजर राहिले. त्यामुळे भाकपने त्यांच्यावर शिस्तभंगाची कारवाई करून त्यांना पक्षातून काढून टाकले. डांगे ऑल इंडिया कम्युनिस्ट पार्टीत गेले व त्यापक्षाचे सरचिटणीस झाले; इकडे भाकप हा पक्ष बर्धन यांच्या नेतृत्वाखाली माकपच्या वाटेने गेला व आता तो पक्ष माकपचा एक उपग्रह होऊन राहिला आहे, हे आपण पाहातोच.

## (७)

भाकपमध्ये ह्या उलाढाली चालल्या असताना मुंबई गिरणी कामगार युनियन (एमजीकेयू) ही भाकपच्या प्रभावाखालीच राहिली. आपण पाहिले की, ७४ चा संप एम्जीकेयूने लढविला होता व कामगारांना बरीच पगारवाढ मिळवून दिली होती. ७७ साली वेतनाचा नवा करार होण्याची वेळ आली व 'एम्जीकेयू'ने नवीन संपाची तयारी चालविली. आता केंद्रात जनतापक्षाचे व महाराष्ट्रात शरद पवार यांच्या पुलोदचे सरकार आले होते. त्यांनी गिरणी मालकांशी बोलून नवा पंचवार्षिक करार करून दिला. तो करार ८२ साली संपला व नव्या कराराची वेळ आली. गिरणगावातील वातावरण तापू लागले, कामगारांना हे दिसत होते की, इतर संघटित उद्योगातील कामगार वेतन, महागाई भत्ता, रजा, प्रवास भत्ता इ. बाबतीत आपल्यापुढे कितीतरी अंतर चालून गेले आहेत. गिरणी कामगारांची ही पीछेहाट झाली होती ती रामिमसं या मान्यताप्राप्त युनियनच्या मालक-धार्जिणेपणामुळे झाली होती, असा कामगारांचा आरोप होता. रामिमसंची मान्यता बी. आय्. आर् कायद्यातील उफराट्या तरतुदीमुळे टिकून राहिली होती. रामिमसंला गिरणगावातून घालवून दिले पाहिजे हा कामगारांचा निश्चय होता.

अशा निकराच्या मौक्यावर खरे तर लालबावट्याने कामगारांचे नेतृत्व करायला हवे होते. कामगारांचे चुरशीचे लढे आजवर लालबावट्यानेच लढविले होते. पण आता, ८२ साली, परिस्थिती बदलली होती. कामगार व लाल-बावटा यांच्यातला दुवा म्हणजे कम्युनिस्ट पक्षाचा कार्यकर्ता. पण ७४ च्या संपानंतर गेल्या आठ वर्षात कम्युनिस्ट पक्षाची मोठी पडझड झाली होती. मा.क.प., भा.क.प., अखिल भारतीय कम्युनिस्ट पक्ष अशा मूळच्या बलदंड पक्षाच्या अनेक चिरफळ्या झाल्या होत्या. कार्यकर्ते विखुरले होते. त्यातून आणीबाणी उठल्यानंतरच्या चार वर्षातील पक्षांतर्गत संघर्षामुळे लालबावटा युनियनचे कार्यकर्ते पुरते उद्ध्वस्त झाले होते व निष्क्रिय बनले होते.

साहजिकच कामगारांनी आता लालबावट्याचा आधार न घेता आपल्या लढ्याला दुसरे समर्थ नेतृत्व शोधले पाहिजे असा निर्णय घेतला. त्यांना नवा नेता सापडला



तो डॉ. दत्ता सामंत यांच्या रुपाने. त्याचे असे झाले की, सेनापती बापट मार्गावर 'एम्पायर डाईंग मिल' नावाचा एक उद्योग होता. ही कापड गिरणी नव्हती तर कापडावर प्रक्रिया करणारा कारखाना होता. बी.आय्.आर् खाली मान्यता मिळालेली इथली युनियन 'मिल मजदूर सभे'ची (म्हणचे जनता पक्षाची कामगार संघटना) घटक होती. १९८० साली इथे बोनसच्या प्रश्नावरून संप झाला. मान्यता प्राप्त युनियनने मालकांशी बोनससंबंधात केलेला करार कामगारांना मान्य नव्हता. या संपाचे नेतृत्व दत्ता सामंतांची युनियन करत होती. दोन महिने संप चालला. संप मोडण्याचे अटोकाट प्रयत्न मालकांनी शिवसेनेच्या गुंडांकरवी केले. पण कामगार हटले नाहीत. शेवटी मालकांनी दत्ता सामंत यांच्या युनियनशी करार करून ज्यादा बोनस दिला व संप संपवला. दत्ता सामंत यांच्या नेतृत्वाचे हे यश पाहून कामगार वर्ग हरखून गेला. बी. आय्.आर् च्या ढालीखाली राहून मान्यताप्राप्त युनियन म्हणून मिरविणाऱ्या रामिमसंला धूळ चारता येईल हा विश्वास बळावला.

१९८० सालचा बोनस ८१ साल संपत आले तरी जाहीर झाला नव्हता. रामिमसंने मालकांशी करार करून विविध गिरण्यातील बोनसची टक्केवारी ठरवली. त्यात आपली फसवणूक झाली, असा कामगारांचा समज झाला. प्रथम मफतलाल ग्रुपच्या स्टॅंडर्ड मिलच्या कामगारांनी स्थानिक समिती नेमून, तिच्या नेतृत्वाखाली संप केला. चार दिवस संप चालला, पण मालक वाटाघाटींना तयार होईना. तेव्हा स्टॅण्डर्ड मिलचे कामगार दत्ता सामंतांना भेटले. हा प्रश्न हाती घ्यायला डॉ. सामंत तयार नव्हते. कारण कामगारांची लढण्याची तयारी कितपत आहे याची त्यांना कल्पना नव्हती; दुसरे, या संपाबाबत कायदेशीर व्यवस्था काय आहे, याचा त्यांचा अभ्यास नव्हता. पण स्टॅण्डर्ड-मिलची संप-समिती हट्टच धरून बसली. तेव्हा दत्ता सामंत यानी गिरणगावात येऊन कामगारांची सभा घेतली. तिला उत्तम प्रतिसाद मिळाला. नंतर त्यांनी आणखी दोन सभा घेतल्या. तेथील अनुभवही उत्साह देणारा होता. शेवटी त्यांनी नरे पार्कात सर्व कामगारांची मोठी सभा घेतली. सभेला तुफान गर्दी लोटली. दत्ता सामंतांनी आता गिरणीकामगारांच्या लढ्यात उतरावयाचे ठरविले. 'महाराष्ट्र गिरणी कामगार युनियन' नावाची नवीन युनियन सामंतांनी स्थापन केली. सर्व विचारांचे कामगार रामिमसं वाले, शिवसेनावाले, लालबावटावाले – दत्ता सामंतांचा झेंड्याखाली एकत्र आले.

१८ जानेवारी १९८२ ला संपाला सुरुवात झाली व संपाला अभूतपूर्व यश मिळाले. ते इतके की रखवाल-दारांखेरीज गिरण्यात कोणीच राहिले नाही. कामगारांनी गिरणीकडे फिरकण्याचेच सोडून दिले. यानंतर सामंतांनी पहिली चूक केली, ती अशी की, त्यांनी कामगारांना मुंबई सोडून आपल्या गावी जावयाला सांगितले. परिणाम असा झाला की, संतापलेला कामगार मुंबईत अनर्थ घडवील अशी सरकारला वाटणारी भीती आता उरली नाही. दुसरे असे की, दत्ता सामंतांची युनियन संपाचे नेतृत्व करीत असली तरी इतर युनियन्स् विराम पावल्या नव्हत्या. एम्.जी.के.यू. (लालबावट्याची युनियन), मार्क्सवाद्यांची युनियन, हिंद मजदूर सभेची युनियन या संघटना अस्तित्वात होत्या व संपातही होत्या. पण दत्ता सामंतांनी या युनियन्संची कधीच दखल घेतली नाही. या युनियन्सनी स्वतःच एक संपर्क समिती स्थापिली होती. दत्ता सामंतांचे थोरले बंधू दादा सामंत या समितीवर होते. पण दत्ता सामंत या संपर्क समितीच्या सभेला कधीच गेले नाहीत.

संपाचे नऊ महिने उलटले. तरी संप मजबूत होता. मोठ्या सभा होत होत्या. दगडफेक, लाठीहल्ले चालले होते. कामगारांचा दत्ता सामंतांवरचा विश्वास कायम होता. 'दे दनादन, दे दनादन! दत्ता सामंत दे दनादन!!' अशा घोषणा दिल्या जात होत्या. पण संपाचा अनुभव असणारे एस्. एम्. जोशी, डांगे, गुलझारीलाल नंदा, यशवंतराव चव्हाण यांच्या सारखे मोठे पुढारी अस्वस्थ होते. जिद्दीने चालविलेला हा संप मोडला, कामगार हतबल व निराशाग्रस्त झाला तर मुंबईतील पुरोगामी चळवळ संपेल व देशातील कामगार-चळवळीला मोठा धोका पोचेल याची धास्ती या पुढाऱ्यांना वाटत होती. एस्. एम्. जोश्यांनी तर इंदिरा गांधींशी बोलणीही केली होती. पण दत्ता सामंत या कशालाच काही किंमत द्यायला तयार नव्हते. होता होता संपाला एक वर्ष झाले. अडीच लाख कामगार वर्षभर संपावर आहेत,








तरी सरकार त्यात लक्ष घालत नाही म्हणून डाव्या पक्षांनी लोकसभेत गदारोळ केला. तेव्हा इंदिरा गांधींनी मुख्यमंत्री वसंतदादा पाटील यांच्याकडे चौकशीचे पत्र पाठविले. वसंतदादांनी उत्तर दिले, 'संप आता शेवटच्या घटका मोजत आहे; काही करण्याची गरज नाही!'

शेवटी गिरणी मालक संघाच्या व अनेक गिरण्यांच्या नोटिसा वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाल्या की १ मे १९८३ च्या आत कामगारांनी कामावर रुजू व्हावे; नाहीतर त्यांना कामावर घेतले जाणार नाही. त्यापूर्वीच कामगारांचा ओघ गिरण्यांकडे वाहू लागला होता. रामिमसंचे व नंतर शिवसेनेच्या युनियनचे कामगार कामावर जाऊ लागले होते. नोटीस आल्यावर लालबावटेवाल्यांनीही आपल्या कामगारांना कामावर पाठवले. १ मे ८३ ला जगाच्या दृष्टीने संप संपला. सामंत मात्र म्हणतच राहिले की, संप चालूच आहे. इतक्या शौर्याने व जिद्दीने लढविलेल्या संपाचा असा निराशेच्या उसासा देऊन शेवट झाला.

(८)

पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे की, सामंतांच्या संपामुळे मुंबईतील गिरण्या बंद पडल्या. पण हा समज बरोबर नाही. अहमदाबादेतील गिरण्याही बंद झाल्या. तिथे कुठे संप झाला होता? गोष्ट अशी होती की, भांडवलदारांना गिरण्या बंदच करावयाच्या होत्या. पूर्वी भांडवलदारांचा कापड गिरणी हा एकच उद्योग होता. पहिल्या-दुसऱ्या महायुद्धात मोठा नफा त्यांनी कमावला होता. आता स्वातंत्र्यानंतर व त्यातही आणीबाणी व नंतरच्या काळात सरकारने भांडवलदारांना उत्तेजन द्यायचे ठरविल्यानंतर गिरणीमालकांनी निरनिराळ्या उद्योगात स्वतःची साम्राज्ये स्थापिली होती. त्या इतर धंद्यात होणाऱ्या फायद्याच्या मानाने कापडाच्या धंद्यातील फायदा कमी होता. एका छपराखाली निरनिराळी खाती चालवून कापड निर्माण करण्यापेक्षा बाहेरून, असंघटित क्षेत्रातून, कापड निर्मितीतल्या वेगवेगळ्या प्रक्रिया करवून घ्यायच्या व तयार मालावर आपला शिक्का मारून माल विकायचा हे मालकांना सोयीचे वाटत होते. गिरण्यांच्या जागा विकून मिळणारा अफाट पैसाही त्यांना दिसत होता. तेव्हा सामंतांमुळे मुंबईतील कापड उद्योग निकाली निघाला हे खरे नाही. गिरणी-मालक गिरण्या बंद करणारच होते. वस्त्रोद्योग संपला तो आर्थिक व व्यवस्थापकीय कारणांनी संपला.

दुसरे असे की, संप काही दत्ता सामंतांनी कामगारांवर लादला नव्हता. कामगारांनी सामंतांना संप सुरू करण्यासाठी व चालवण्यासाठी बोलावून घेतले. सामंतानी संप प्रामाणिकपणे व जिद्दीने लढवला. त्यांच्या नेतृत्वाखालच्या कामगार संघटना मुंबईतील निरनिराळ्या कारखान्यात होत्या. त्या संघटनांचे द्रव्यबळ व मनुष्यबळ त्यांनी या लढ्यात उतरवले. कामगारही वाघासारखे लढले; पण पराभूत व उद्ध्वस्त झाले. केवळ कामगारच नव्हेत तर गिरणगावातील इतर छोटे उद्योग लहान दुकानदार, व्यापारी, फेरीवाले, खानावळवाले यांनाही जबर तडाखा बसला. गिरणगावच उठल्या सारखे झाले. गिरण्यातून देखील कामगार रूजू झालेल्या कामगारांना अपमानास्पद वागणूक मिळाली. पदोपदी त्यांना हेटाळणी सहन करावी लागली. शेवटी गिरण्या बंद पडल्याच.

पण या सर्व घडामोडीत लालबावट्याचे काय झाले? मुंबईतील गिरणगावाच्या जडणी-घडणीत लालबावट्याचा मोठा भाग होता. अहमदाबादेला गिरण्यांची संख्या मुंबईतील गिरण्यांच्या संख्येपेक्षा जास्त होती. पण तिथे गिरणगाव तयार झाले नाही. कारण मुंबईत कम्युनिस्टांनी रुजविलेला युनियनिझम हा ध्येयवादाला बांधील असा युनियनिझम होता. सर्व कामगारांना त्या ध्येयवादाचे आकलन झाले नसेलही. पण कामगारातील एक मोठा भाग या ध्येयवादाचे संस्कार झालेला होता. त्यामुळे साम्राज्यशाहीला विरोध, भांडवलदारीला विरोध, जातीय व धार्मिक कट्टरतेला विरोध या गोष्टी कामगारांच्या विचारांचा भाग बनल्या. 'वर्गसंघर्ष', 'कामगारांचे ऐक्य' या केवळ घोषवर राहिल्या नाहीत; त्या अनेक कामगारांच्या व्यक्तिमत्त्वाचा गाभा झाल्या. अशा या गिरणगावाचे उद्ध्वस्त होणे, तेथील गिरण्यांच्या जागी चंगळीच्या वस्तूंची खाते-दुकाने उभी राहाणे, मस्तवाल बांधकाम-उद्योगाने तेथे गुरमीने वावरणे यातून कम्युनिस्ट ध्येयवादाचा शेवट व भांडवलशाहीची उभारी व्यक्त होते.





अनुक्रमणिका






## लेखकांचा परिचय

- **श्री. बाबूराव चंदावार**
  समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक
  *पत्ता :–* सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.

- **प्रा. डॉ. रोहिणी तुकदेव**
  'मराठी कादंबरी'च्या उगम व विकासाचा विशेष अभ्यास.
  *पत्ता :* जी/०३, खरे हौसिंग, ग्रुप प्रॉजेक्ट, मु. पो. धामणी, सांगली – ४१६ ४१६.

**टीप :–** नोव्हेंबर–डिसेंबर २००९ च्या जोड अंकातील लेखकांच्या परिचयात कै. मे. पुं. रेगे यांच्या मृत्यूची तारीख २८/१२/१९९८ अशी पडली आहे. ती तारीख २८/१२/२००० अशी हवी. झालेल्या चुकीबद्दल खेद वाटतो.

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

- संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

अनुक्रमणिका

रजिस्टर क्र. 11697/57



हे मासिक च. वा. जोशी यांनी के सागर ग्राफिक्स ॲण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका